


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य परिषदेची
# महाराष्ट्रातील दुष्काळग्रस्तांना मदत



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे विभागीय साहित्य संमेलन पुण्यात दि. २५, २६ व २७ मे १९८६ रोजी साजरे झाले. या संमेलनाच्या उत्पन्नातून साहित्य परिषदेने महाराष्ट्रातील दुष्काळग्रस्तांच्या मदतीसाठी रु. ५०००।– ची देणगी दिली. देणगीचा चेक साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी यांनी मुख्यमंत्री श्री. शंकरराव चव्हाण यांना दिला. त्या प्रसंगी डावीकडून श्री. राजेन्द्र बनहट्टी, परिषदेचे कार्यवाह श्री. राजा फडणीस, संमेलन समितीचे सदस्य श्री. श्याम कोपर्डेकर आणि अर्थमंत्री श्री. सुशीलकुमार शिंदे.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २३७ ▭ एप्रिल ते जून १९८६ ▭ मूल्य पाच रुपये

## साहित्यसंस्था विशेषांक

## अनुक्रम



संपादक : **डॉ. वसंत स. जोशी**

संपादन समिती : **ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवन्त**

सल्लागार : **राजेन्द्र बनहट्टी, गो. म. कुलकर्णी**

प्रकाशक व मुद्रक : **डॉ. म. वि. गोखले**

कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ४११०३०

दूरध्वनी : ४४२९६३

मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत

अनुक्रमणिका






## संपादकीय

### म. सा. परिषदेचा ८० वा वर्धापनदिन आणि ४ थे विभागीय साहित्य संमेलन

२७ मे १९०६ रोजी स्थापन झालेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेस दि. २७ मे १९८६ रोजी ऐंशी वर्षे पूर्ण झाली. म. सा. परिषद ही महाराष्ट्रातील साहित्यसंस्थांची मातृसंस्था असल्यामुळे या निमित्ताने प्रमुख साहित्य संस्थांचा परिचय करून देणारा 'साहित्य संस्था विशेषांक' आम्ही प्रसिद्ध करण्याचे योजिले. या संस्थांचे 'स्वरूप, समस्या आणि अपेक्षा' यांचे विवरण त्या त्या लेखात व्हावे, अशी अपेक्षा होती. उपलब्ध साहित्य या अंकात दिले आहे. त्यावरून महाराष्ट्रातील साहित्य चळवळीशी निगडित अशा संस्थांच्या स्थितीगतीचा परिचय वाचकांना होऊ शकेल. महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति-मंडळाविषयीचा लेख काही अडचणींमुळे मिळू शकला नाही. तथापि त्याच्या स्थापनेच्या वेळी निश्चित झालेली उद्दिष्टे व स्वरूप यांची माहिती दिलेली आहे. या विविध साहित्यसंस्थांच्या कार्यात काही एकसूत्रता आणता येईल का या विचाराने आम्ही एक प्रश्नावली महाराष्ट्रातील प्रमुख पत्रकार, विचारवंत, संमेलनाध्यक्ष, साहित्यिक, कार्यकर्ते यांच्याकडे पाठविली; परंतु फारच थोड्यांनी उत्तरे पाठविण्याविषयी आस्था दाखविली. आलेली उत्तरे व प्रश्नावली या अंकात दिलेली आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्रातील साहित्य चळवळीचा पुनर्विचार होणे आवश्यक आहे, असे वाटते. म. सा. परिषदेच्या ऐंशीव्या वर्धापनदिनाला जोडूनच चौथे विभागीय साहित्य संमेलन प्रा. वसंत कानेटकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आले. त्यांचे अध्यक्षीय भाषण व संमेलनाचा समग्र वृत्तांत या अंकात देण्यात आला आहे.

### अभिनंदन

सुप्रसिद्ध समीक्षक, आधुनिक मराठी नवसाहित्याचे प्रवक्ते आणि हैदराबाद येथील साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. वा. ल. कुलकर्णी आणि सुप्रसिद्ध समीक्षक प्रा. माधव मनोहर यांनी आपल्या वयाची ७५ वर्षे पूर्ण केली.

सुप्रसिद्ध समीक्षक, 'म. सा. पत्रिके'चे माजी संपादक आणि पुणे विद्यापीठाच्या राष्ट्रीय प्रौढ शिक्षण विभागाचे संचालक डॉ. भालचंद्र फडके यांचा मे महिन्यात एकषष्ठी निमित्त सत्कार करण्यात आला. सुप्रसिद्ध कथालेखिका सौ. ज्योत्स्ना देवधर यांची आणि सौ. शैलजा राजे यांची षष्ठ्यब्दी साजरी झाली. सुप्रसिद्ध विनोदी साहित्यिक आणि फर्ग्युसन महाविद्यालयाचे माजी प्राचार्य वाळ गाडगीळ यांनी मार्चमध्ये एकषष्ठीमध्ये पदार्पण केले. पुणे विद्यापीठाचे प्र- कुलगुरू म्हणून त्यांची नियुक्ती झाली. अहमदनगर येथील म. सा. परिषदेचे जुने कार्यकर्ते आणि माजी कार्यवाह श्री. द. वा. डावरे यांनी ८५ व्या वर्षात पदार्पण केले.

या सर्वांचे आम्ही अभिनंदन करतो आणि त्यांना आरोग्यपूर्ण दीर्घायुष्य इच्छितो.

पुण्याच्या 'स्वराज्य' साप्ताहिकाने एप्रिलमध्ये आपला सुवर्ण महोत्सव साजरा केला. दैनिकांच्या रविवारीय आवृत्त्यांमुळे मराठी साप्ताहिकांची जुनी परंपरा नष्ट होण्याची भीती असताना 'स्वराज्य' आपली पन्नाशी पूर्ण करून पुढील वाटचाल करीत आहे हे त्याच्या लोकप्रियतेचे गमक आहे. आम्ही 'स्वराज्य'च्या संचालकांचे आणि संपादकांचे अभिनंदन करतो.



अनुक्रमणिका

## अभिवादन

मार्च महिन्यात कोल्हापूरचे सुप्रसिद्ध नेते **भाई श्री. माधवराव बागल** यांचे निधन झाले. राजकीय आणि सामाजिक चळवळीत त्यांनी हिरीरीने भाग घेतला. ते एक उत्कृष्ट चित्रकार, पत्रकार आणि साहित्यिक होते. आपले आत्मचरित्र त्यांनी 'जीवनप्रवाह' या नावाने लिहिलेले आहे.

मे महिन्याच्या २७ तारखेस स. प. महाविद्यालयातील संस्कृतचे माजी प्राध्यापक **अरविंद मंगरूळकर** यांचे दीर्घ आजाराने निधन झाले. म. सा. परिषदेचे कार्यवाह म्हणून तीन वेळा त्यांनी काम केले होते. साहित्य, संगीत, चित्रकला, भाषाशास्त्र, व्याकरण हे त्यांच्या आवडीचे विषय होते आणि त्यावर त्यांनी लेखनही केलेले आहे. 'रसिकाग्रणी' म्हणून त्यांचा लौकिक होता.

हैदराबादच्या उस्मानिया विद्यापीठातील मराठीचे माजी प्राध्यापक **र. म. मुसारी** यांचे एप्रिलमध्ये देहावसान झाले. ते एक उत्तम संशोधक होते. 'महाराष्ट्रातील धार्मिक संप्रदायांचा इतिहास' हे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध आहे. 'पाच समुदाय' या पुस्तकामुळे परिचित असलेले **डॉ. पं. रा. मोकाशी** यांचेही याच काळात निधन झाले.

आधुनिक कन्नड साहित्याचे भीष्माचार्य म्हणून ज्यांचा यथार्थ गौरव केला जात असे ते ज्येष्ठ-श्रेष्ठ साहित्यिक **श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार** आपल्या ९६ व्या वाढदिवशीच बंगलोर येथे मृत्यू पावले. तमिळ मातृभाषा असणारे मास्ती कन्नड साहित्याचे मानदंड ठरावेत आणि भारतीय स्तरावर त्यांची कीर्ती परिमलाप्रमाणे पसरत जावी हा एकूणच भारतीय साहित्यातला एक चमत्कार म्हणावा लागेल. कथा, कादंबरी, नाटक, समीक्षा, संपादन, आत्मचरित्र इत्यादी नाना वाङ्मयप्रकारात मास्तींच्या प्रतिभेचा अविरत संचार होता. 'चिक्कवीर राजेंद्र' या त्यांच्या ऐतिहासिक कादंबरीला एक लाखाचा ज्ञानपीठ पुरस्कार लाभला (१९८३) ही घटना त्यांच्या वाङ्मयीन गुणवत्तेची पुरेशी द्योतक आहे. परंपरा आणि आधुनिकता यांचा मनोज्ञ संगम त्यांच्या प्रायः सर्व लेखनात आहे. मास्तींची ग्रंथसंख्या सुमारे शंभर असून त्यांतील गाजलेल्या कृतींचे अनेक भाषांत अनुवाद झालेले आहेत. कन्नड साहित्य परिषदेचे ते एक संस्थापक होते. त्यांची त्रिखंडात्मक आत्मकथा वाचली की, माणूस आणि साहित्यिक या उभय नात्याने त्यांच्या समृद्ध व्यक्तित्वाची कल्पना येते.

या सर्वांच्या पवित्र स्मृतीस आम्ही अभिवादन करतो.

## 'पत्रिके'चे पुढील अंक

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा हा 'साहित्यसंस्था विशेषांक' प्रसिद्ध करीत असतानाच यापुढील दोन विशेषांकांची योजना आम्ही जाहीर करीत आहोत. प्रा. श्री. म. माटे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त 'माटे विशेषांक' आणि त्यानंतर 'गझल विशेषांका'चे संयोजन चालू आहे. हे सर्व अंक वाचकांना आवडतील, असा विश्वास वाटतो.

**संपादक**



अनुक्रमणिका






**महाराष्ट्र साहित्य परिषदेचे**

**नवे प्रकाशन**

# भाषा व साहित्य : संशोधन

(खंड दुसरा)

**संपादक : डॉ. वसंत स. जोशी, डॉ. गं. ना. जोगळेकर**

**पृष्ठे : डेमी ४५४ मूल्य : ९० रु.**

| विषय | लेखक |
|---|---|
| १. संहिता संपादनाच्या नव्या दिशा | — डॉ. श्री. रं. कुलकर्णी |
| २. भाषावैज्ञानिक संशोधनाची काही क्षेत्रे | — डॉ. कल्याण काळे |
| ३. वाङ्मय आणि शैली विज्ञान : भाषा वैज्ञानिक दृष्टिकोण | — डॉ. रमेश धोंगडे |
| ४. सूचिविज्ञान | — डॉ. कृ. शं. हिंगवे |
| ५. पाश्चात्यांचे मराठीविषयक संशोधन व अभ्यास | — डॉ. शं. गो. तुळपुळे |
| ६. महानुभावीय लिप्या : काही विचार व त्यांचा परिचय | — डॉ. व. वि. पारखे |
| ७. मध्य मराठी साहित्याचा तौलनिक अभ्यास | — डॉ. र. वा. मंचरकर |
| ८. अर्वाचीन मराठी साहित्याचा तौलनिक अभ्यास | — डॉ. रा. ग. जाधव |
| ९. भिन्नभाषिक साहित्याचा तुलनात्मक अभ्यास | — डॉ. कृष्ण दिवाकर |
| १०. वाङ्मय-प्रकारांचा अभ्यास | — डॉ. मधू कुलकर्णी |
| ११. लोकसाहित्याचा अभ्यास : स्वरूप व पद्धती | — डॉ. गं. ना. मोरजे |
| १२. लोकसाहित्याचा ‘ क्षेत्रीय ’ अभ्यास | — डॉ. तारा भवाळकर |
| १३. कीर्तन वाङ्मय आणि संशोधन | — डॉ. यशवंत पाठक |
| १४. मोडी लिपी आणि संशोधन | — श्री. मो. रा. वाळंबे |
| १५. मराठी प्रबंध : स्वरूप आणि साधने | — डॉ. एस. एस. भोसले |
| १६. मराठी साहित्य संशोधन : सद्यःस्थिती व दिशा | — डॉ. गो. मा. पवार |
| १७. अद्ययावत प्रबंध सूची | — डॉ. म. प. पेठे |

**संपर्क :** कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०

म. श्री. दीक्षित

# मराठी साहित्य महामंडळ

मजबूत केंद्रसत्ता आणि त्या केंद्रसंस्थेचे स्वायत्त घटक ही राजकीय क्षेत्रातील लोकशाही व्यवस्था जीवनाच्या सर्व क्षेत्रांत हळुहळू कशी प्रसृत होत जाते याचं मराठी मुलखातलं एक ठळक उदाहरण द्यायचं तर 'मराठी साहित्य महामंडळ' या संस्थेच्या निर्मितीचं देता येईल. चालू शतकाच्या आरंभापासून महाराष्ट्रराज्यनिर्मिती-पर्यंतच्या साठएक वर्षांच्या काळात मराठी मुलुखात अनेक साहित्यसंस्था निर्माण झाल्या. आपापल्या क्षेत्रात आपापल्या कुवतीनुसार त्या वाढत राहिल्या. साहित्य-संमेलनं, वार्षिकोत्सव, चर्चा-परिसंवाद, कविसंमेलनं, नाटचप्रयोग, वाङ्मयीन नियतकालिकांचं संचालन, परीक्षा इत्यादी कार्यक्रम या संस्थांकडून सतत होत असतात व त्यामुळे मराठी साहित्यप्रसार मोठ्या प्रमाणावर होतो यात शंका नाही. तथापि या सर्व 'संस्थांच्या धोरणात व कार्यात एकसूत्रीपणा व सहकार्य' निर्माण करणे आणि व्यापक, समान अशा कार्यांबाबत एकमुखी प्रतिनिधित्व करणे या गोष्टीची नितान्त आवश्यकता होती.

वास्तविक महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ही सर्वाधिक ज्येष्ठ साहित्यसंस्था (स्था. १९०६) मध्यवर्ती प्रातिनिधिक साहित्यसंस्था या नात्याने अर्धशतकभर नांदत होती. तथापि विदर्भ, मराठवाडा व इतर मराठी मुलखात जसजसा शिक्षण नि साहित्यप्रसार होऊ लागला तसतशी प्रादेशिक भावना वाढू लागली आणि या दोन्ही क्षेत्रांत पुण्या-मुंबईप्रमाणेच संस्थात्मक चळवळी उभ्या राहू लागल्या. 'पुण्या-मुंबईकडून आमची उपेक्षा होते, आम्हाला कमी लेखले जाते, आम्हाला संधी मिळत नाही.' असे असंतोषाचे सूर या दूरदूरच्या भागातून ऐकू येऊ लागले होते. हा असंतोष किंवा एकप्रकारचा न्यूनगंड नाहीसा होणे आवश्यक होतं. याचा अर्थ एखाद्या विभागाची किंवा साहित्यिकाची कोणी जाणून-बुजून उपेक्षा करीत होता असा नाही. पुण्यासारख्या केंद्रस्थानाहून जागृत होणाऱ्या समस्त मराठी मुलखाचं न्याय्य प्रतिनिधित्व करणं ही गोष्ट व्यवहार्यच नव्हती. म्हणून प्रादेशिक भावनांची कदर करून सर्व मराठी भाषिकांची खऱ्याखुऱ्या अर्थाने प्रतिनिधित्व करू शकेल अशी एखादी नवी मध्यवर्ती साहित्यसंस्था निर्माण करण्याचा स्वातंत्र्योत्तर काळात विचार बळावू लागला. तो विचार एकमुखी मागणीरूपाने प्रत्यक्ष जनतेपुढे आला मे १९५१ मधील कारवार साहित्य संमेलनात. (सूक्ष्मपणे पाहिलं तर आधीच्या वर्षी बेळगावी भरलेल्या गोमंतक मराठी सा. संमेलनाच्या ५ व्या अधिवेशनात या प्रश्नांना वाचा फोडणारा ठराव संमत झालेला होता.)

मे १९५१ च्या पहिल्या आठवड्यात कारवार येथे मराठी साहित्य संमेलनाचं ३४ वं अधिवेशन अ. का. प्रियोळकर यांच्या अध्यक्षतेखाली भरलं होतं. पोतदार, अत्रे, माटे, माडखोलकर, काणेकर, घाटे, रा. श्री. जोग, शं. दा. पेंडसे, श्री. शं. नवरे, सुंठणकर, ह. रा. महाजनी. प्रभाकर पाध्ये, र. के. खाडिलकर, महादेवशास्त्री जोशी इत्यादी साहित्यिक व प्रतिनिधी या प्रसंगी मोठ्या संख्येने उपस्थित होते. निसर्गरम्य पार्श्वभूमी लाभलेल्या या संमेलनाच्या सुरस हकीकती अत्र्यांनी लिहून ठेवलेल्या आहेत. संमेलनात जे २४ ठराव संमत झाले त्यातला २० वा ठराव 'प्रमुख साहित्य संस्थांचे दृढीकरण व एकीकरण' करण्याची शिफारस करणारा होता व साहित्यपरिषदेने पुढाकार घेऊन इतर संस्थांच्या सहकार्याने सहा महिन्यांच्या आत एक योजना तयार करावी असा आदेशही देण्यात आला होता. त्याप्रमाणे परिषदेच्या कार्यकारी मंडळाने द. वा. पोतदार यांच्या मार्गदर्शनाखाली एक समिती नेमली व समिती कार्याला लागली. पण हे कार्य वाटलं होतं तेवढं सोपं नव्हतं, घटनात्मकदृष्ट्या वेळखाऊपणाचं ठरलं.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या धर्तीवर कार्यान्वित झालेल्या विदर्भ साहित्य संघ (स्थापना १९२३), मुंबई मराठी साहित्य संघ (स्था. १९३५), आणि मराठवाडा साहित्यपरिषद (स्थापना १९३७) या महाराष्ट्र राज्यातील तीन प्रमुख संस्थांच्या सहकार्याशिवाय कारवार संमेलनातील ठरावाचा हेतू सिद्धीस

जाणार नव्हता. याबाबतीत समाधानाची गोष्ट अशी होती की, या तिन्ही संस्थांचा वरील ठरावास तात्त्विक पाठिंबा होता. आपापली स्वायत्तता कायम ठेवून नवी प्रातिनिधिक मध्यवर्ती संस्था कशी निर्माण करायची एवढाच प्रश्न होता. इच्छा सर्वांची होती, पण चारपाच वर्षे याबाबतीत विशेष काहीच घडू शकलं नाही. थोडी-फार या प्रश्नाला चालना मिळाली ती १९५७ च्या औरंगाबाद संमेलनात (अ. काणेकर). या संमेलनात म. सा. परिषद (पुणे) आणि वरील तीन संस्था यांचे प्रत्येकी दोन प्रतिनिधी मिळून एक समिती नेमली गेली व पुढील संमेलनापर्यंत या समितीने आपली योजना तयार करावी असा आदेश देण्यात आला. त्याप्रमाणे १९५८ च्या मालवण संमेलनात (अ. अनिल) समितीने तयार केलेल्या योजनेचा एक कच्चा खर्डा सादर करण्यात आला. पुढल्या मिरजेच्या संमेलनात (अ. श्री. के. क्षीरसागर) हाच खर्डा शाब्दिक फेरफारासह सर्वसंमत करण्यात आला. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ६ जून १९६० च्या वार्षिक सभेने या खर्ड्याला म्हणजे 'मराठी साहित्य महामंडळा' च्या स्थापनेला एकमुखी पाठिंबा दिला. त्यामुळे महामंडळाची औपचारिक स्थापना होणे सुलभ गेले.

अखेर १ जानेवारी १९६१ रोजी वरील चार घटक-संस्थांचे मिळून 'मराठी साहित्य महामंडळ' स्थापन झाल्याचे घोषित करण्यात आले.

यानंतर ऑक्टोबर १९६१ मध्ये ग्वाल्हेर संमेलनात (अ. कुसुमावती देशपांडे) महामंडळ स्थापन झाल्याबद्दल आनंद आणि समाधान व्यक्त करणारा ठराव सर्वसंमत झाला व मंडळ रीतसर मार्गस्थ व्हावे अशी अपेक्षा व्यक्त करण्यात आली. अशा रीतीने कारवार संमेलना-तील ठराव प्रत्यक्षात येण्यास जवळजवळ दहा वर्षे लागली. त्याचं मुख्य कारण चारही साहित्यसंस्थांच्या कार्यकारी मंडळांची आणि वार्षिक साधारण सभांची मान्यता घेणं आवश्यक होतं. सर्वांकडून ती येण्यात एवढा कालावधी गेला.

महामंडळाची स्थापना झाली याचा अर्थ घटनात्मक-रीत्या मराठी भाषिकांची एक नवी मध्यवर्ती, प्राति-निधिक संस्था निर्माण झाली. पुण्याची महाराष्ट्र साहित्य परिषद १९६० पर्यंत महामंडळाचीच भूमिका पार पाडीत होती. पण आता काळाचे भान ठेवून महामंडळाच्या स्थापनेत तिनेच पुढाकार घेतला व आपली मध्यवर्ती प्रातिनिधिक संस्थेची जबाबदारी तिने मोठ्या मनाने महामंडळावर सोपवली. गतवर्षी परिषदेने आपले कार्य-क्षेत्रही पश्चिम महाराष्ट्रातील १३ जिल्ह्यांपुरते मर्यादित केले. अर्थात सभासद होण्याची पूर्ववत सर्वांना मोकळीक ठेवली आहे. महामंडळाच्या स्थापनेला गती देण्यापासून त्याची स्थापना होऊन ते आपल्या पायावर नीट उभे राहीपर्यंत साहित्य परिषदेने जी कामगिरी बजावली ती तिच्या ज्येष्ठत्वाला साजेशीच झाली. माझ्या माहितीप्रमाणे कै. म. म. पोतदार, रा. श्री. जोग, श्री. के. क्षीरसागर, गं. बा. सरदार या परिषदेच्या काही दूरदर्शी कार्यकर्त्यांनी, तसेच कै. श्रीपादराव नवरे, बापूराव नाईक, कविवर्य अनिल इत्यादींनी महामंडळाच्या स्थापनेत व ते कार्यान्वित करण्यात मोलाची कामगिरी बजावली आहे. त्यातही पोतदार, नवरे आणि अनिल यांना अधिक श्रेय देणे न्याय्य होईल.

घटनेच्या आधारेच सांगायचं तर महामंडळाचं स्वरूप थोडक्यात असं सांगता येईल– 'मराठी साहित्याच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या संस्थांच्या धोरणात व कार्यात एकसूत्रीपणा व सहकार्य निर्माण करणे व त्यांचे घटनेत निर्देशिलेल्या कार्यासाठी प्रतिनिधित्व करणे.' हे झाले महामंडळाचे उद्दिष्ट आणि निर्देशिलेली कामे येणेप्रमाणे- १) भाषा व साहित्यविषयक धोरण ठरविणे. २) शासन संस्थांशी व भिन्नभाषिक संस्थांशी संपर्क ठेवून मराठीचे प्रतिनिधित्व करणे. ३) प्रतिवर्षी अ. भा. मराठी साहित्य संमेलन भरविणे. ४) मंडळाच्या घटक, समाविष्ट व संलग्न संस्थांच्या निवेदनांचा विचार करणे व त्यांच्या सहकार्याने कार्य करणे.

आजमितीस महाराष्ट्र साहित्य परिषद (पुणे), मुंबई मराठी साहित्य संघ (गिरगाव), विदर्भ साहित्य संघ (नागपूर) आणि मराठवाडा साहित्य परिषद (औरंगाबाद) या महामंडळाच्या महाराष्ट्र राज्यातील चार घटकसंस्था असून, आंध्रप्रदेश मराठी साहित्य परिषद (हैद्राबाद), मध्यप्रदेश मराठी साहित्य परिषद (जबलपूर), कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद (गुलबर्गा) आणि गोमंतक साहित्य सेवक मंडळ (पणजी) या इतर चार राज्यांतील संस्था समाविष्ट संस्था आहेत. घटक संस्थेचे प्रत्येकी तीन आणि समाविष्ट संस्थेचा प्रत्येकी एक–याप्रमाणे एकूण १६ प्रतिनिधी मिळून महामंडळ अस्तित्वात आहे व या सर्वांच्या संमतीने मंडळाचे कार्य चालू असते. साधारणपणे दर

चार महिन्यांनी महामंडळाची सभा भरते. घटक व समाविष्ट संस्थांची वार्षिक वर्गणी, संमेलनाकडून मिळणारी काही रक्कम आणि शासकीय अनुदान ही मंडळाची उत्पन्नाची साधने आहेत. दर तीन वर्षांनी महामंडळाच्या प्रतिनिधींची व पदाधिकाऱ्यांची निवडणूक होते. मंडळाचे कार्यालय आलटूनपालटून एका घटकसंस्थेकडे असते. सांप्रत ते मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद या ठिकाणी आहे.

महामंडळाचं सर्वांच्या नजरेत भरणारं मुख्य कार्य म्हणजे दरवर्षी भरणारं अ. भा. मराठी साहित्य संमेलन. संमेलनाच्या अध्यक्षांची निवडपद्धती महामंडळाने नियमावली तयार करून ठरविलेली आहे. माझ्या मते ती त्यातल्या त्यात प्रातिनिधिक, व्यवहार्य अशी आहे. जिथपर्यंत अधिक चांगली व सर्व संस्थांना मान्य होईलशी पद्धत कोणी सुचवत नाही तिथ्पर्यंत प्रचलित पद्धत अनुसरण्याशिवाय मार्ग नाही.

१९६१ साली महामंडळ स्थापन झालं. त्याची पहिली सभा १२ फेब्रुवारी १९६१ रोजी पुण्याला साहित्य परिषदेच्या सभागृहात झाली नि तीत पोतदार (अध्यक्ष), पु. य. देशपांडे (उपाध्यक्ष), अनंतराव भालेराव (कोषाध्यक्ष) आणि श्री. शं. नवरे (कार्यवाह) या चार पदाधिकाऱ्यांची निवड झाली. यानंतर दुसरी व तिसरी सभा मुंबई व औरंगाबाद येथे झाली. कै. नवरे यांच्यासारखा सर्वांना सांभाळून घेणारा निरलस कार्यवाह महामंडळाला आरंभीच्या काळात मिळाल्यामुळे, त्याची वाटचाल निर्विघ्नपणे सुरू झाली. महामंडळ लवकरच नोंदणी कायद्याप्रमाणे रीतसर नोंदविण्यात आलं.

महामंडळ आपल्या पायावर नीटपणे उभं राहीपर्यंत ठाणे (१९६०), ग्वाल्हेर (१९६१), सातारा (१९६२) आणि अभूतपूर्व गर्दीचं मडगाव-गोवा (१९६४) ही चार संमेलनं साहित्य परिषदेने पूर्ववत भरविली. ही जबाबदारी महामंडळानेच परिषदेवर सोपवलेली होती. तदनंतर हैद्राबाद (१९६५) संमेलनापासून महामंडळाने आजवर १४ साहित्यसंमेलनं भरविली. मुंबईचं आगामी हीरक महोत्सवी (साठावं) संमेलन महामंडळ कशा रीतीने साजरं करणार याकडे आता सर्वांचे डोळे लागले आहेत. महामंडळाला गतवर्षी २५ वर्षे पूर्ण झाली. या पंचवीस वर्षांत संमेलनाखेरीज भरीव असं कार्य महामंडळाच्या नावावर एकच जमा आहे आणि ते म्हणजे शुद्धलेखनाचे नवे नियम तयार करून त्यांना शासनाच्या शिक्षणखात्याची मान्यता मिळवणं. हे कार्य महामंडळाच्या आरंभीच्या वाटचालीत झाल्यामुळे (शासनाचा २०-९-१९६२ चा ठराव) आज ते कुणाच्या लक्षात नाही. पण महाराष्ट्र राज्यातील सर्व शैक्षणिक स्तरांवर या नियमांचा वापर होत आहे व त्यामुळे एकचएक लेखनपद्धती रूढ होण्यास पुष्कळ मदत होत आहे. संमेलनाध्यक्ष निवडणूक पद्धती आणि शुद्धलेखन नियम या दोन्ही बाबतींत विद्वानांत एकमत होण्याची शक्यता फार कमी असल्यामुळे मतामतांमधील अंतर कमी करून जेवढं काही करता आलं ते कार्य महामंडळाने केलं आहे.

मराठी साहित्य महामंडळ ही मराठी भाषकांची केंद्रीय संस्था म्हणून गेली पंचवीस वर्षे नांदत आली आहे. तिच्या चार प्रमुख घटकसंस्थांना आणि समाविष्ट संस्थांना आपापल्या क्षेत्रात कार्य करण्याची पूर्ण स्वायत्तता आहे. पण सांप्रत अ. भा. मराठी सा. संमेलन भरविण्याखेरीज महामंडळाला जवळजवळ काही कार्य उरलेलं नाही. 'सर्व शासनसंस्थांशी, तसेच आंतरराष्ट्रीय, आंतरराज्यीय आणि भिन्न भाषिक सांस्कृतिक संस्थांशी व साहित्यसंस्थांशी भाषिक व सांस्कृतिक प्रश्नासंबंधी अवश्य तो व्यवहार करून मराठी भाषिकांचे सर्वतोपरी प्रतिनिधित्व' करण्याकडे मंडळाचं पुरेसं लक्ष गेल्याचं दिसत नाही. भारतीय जनतेत एकात्म भावना निर्माण होण्याच्या दृष्टीने हे कार्य फार महत्त्वाचं आहे.

महामंडळाच्या वतीने भरणाऱ्या संमेलनाच्या अध्यक्षीय निवडणुकीबाबत एक सुधारणा तातडीने होण्याची गरज आहे. घटक, समाविष्ट संस्थांचा मर्यादित संख्येचा मतदारसंघ, आजीमाजी अध्यक्ष आणि स्वागत मंडळाचे मतदार मिळून सुमारे २७५ मतदार अध्यक्षांची निवड करतात. या संख्येत स्थानिक स्वागतमंडळाचे ५० मतदार सभासद असतात. ही संख्या अप्रमाण व अन्यायकारक वाटते. अ. भा. मराठी भाषिक संमेलनाचा अध्यक्ष निवडताना हंगामी स्वरूपाच्या स्थानिक संस्थेला एवढा परिणामकारक अधिकार असणं हे लोकशाहीतत्त्वाच्या विरुद्ध आहे. अध्यक्षीय निवडीत स्वागत मंडळाच्या मताची कदर करण्यासाठी मंडळाला २५ मते देणे पुरेसे होईल. आणखी एक सूचना अशी की, मंडळाचे कार्य सुरळीत चालण्यासाठी त्याचे कार्यालय दप्तरासकट फिरते ठेवण्यापेक्षा एकाच घटकसंस्थेच्या ठिकाणी ते कायमचे ठेवावे. कार्यालय फिरते ठेवल्यामुळे आजवर ज्या कारभारविषयक गैरसोयी ध्यानी आल्या त्या विचारात घेऊन ही सूचना आवर्जून कराविशी वाटते.

डॉ. सौ. उषा जोशी

# साहित्य अकादमी : स्वरूप, समस्या आणि अपेक्षा

स्वातंत्र्योत्तर काळात भारतात साहित्याच्या अभिवृद्धीसाठी जे काही जाणीवपूर्वक व संघटित प्रयत्न झाले, त्यात साहित्य अकादमी या संस्थेचा प्रामुख्याने निर्देश करावा लागेल. भारतातील साहित्य-निर्मितीची, साहित्याभ्यासाची व साहित्यविचाराची परंपरा प्रदीर्घ व अखंडित आहे. संस्कृत भाषेच्या अनुबंधामुळे तिला प्राचीन काळी बरेच सुसंघटित स्वरूपही मिळाले; परंतु देशभाषांची संख्या, त्यांचा विकास, त्यांनी व्यापलेला भूगोल इ. अनेकविध बाबी विचारात घेतल्या तर भारतीय साहित्याचे एकरूपत्व साधणे हे मध्ययुगीन काळात किती अडचणीचे झाले असेल, याची कल्पनाच केलेली बरी. भरतखंडात भाषावैविध्य असले तरी या देशाचे अंतःकरण एक आहे; पण ते ओळखणे, त्याला संवादी असे सांस्कृतिक घटक वातावरणात उपलब्ध होऊन मानवी सभ्यतेचा, सुसंस्कृतपणाचा, निर्मितिक्षमतेचा आदर्श प्रस्थापित करणे ही प्रक्रिया तीन-चार शतकांपासून खंडित होण्याची पाळी आली होती; विशेषतः १८ व्या व १९ व्या शतकातील राजकीय अस्थिरतेमुळे व सार्वत्रिक ग्लानीमुळे. इंग्रजी अमलात तिची आणखी पीछेहाट झाली. अंतःकरण एक याचा अर्थ एवढाच की जाणिवेचे व संवेदनक्षमतेचे सुसंवादित्व. हे सुसंवादित्व जीवनातील आदर्श व स्वप्न यांच्या उपासनेतून येते; तसेच जगण्याच्या धडपडीतून, मूल्यांच्या साधनेतून येते. ही साधना कलानिर्मिती व ज्ञानोपासना यांच्या प्रसन्नतेचे मळे फुलविते. त्यासाठी तर सगळा अट्टाहास करायचा. इंग्रजी अमदानीच्या उत्तरकाळात या लुप्तप्राय, खंडित प्रक्रियेला चालना देण्याचा क्षीण प्रयत्न झाला. पण तो पुढे उभा राहिला नाही. सामाजिक व राजकीय घडी नीट बसल्यावर सर्वांना उसंत मिळाली व विचार सुरू झाला. त्यातून अखिल भारतीय पातळीवर भारतीय साहित्यजीवनाचे संगोपन व संवर्धन करणारी संस्था उभी राहिली. 'साहित्य' शब्द भारतीय परंपरेतून आला, तर निर्मितीची खूण सुचविणारा 'अकादमी' शब्द ग्रीक परंपरेतून आला. ज्ञानाची व प्रज्ञेची स्तोत्रे गाणारा. १२ मार्च १९५४ ला भारतीय संसदेच्या सभागृहात डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् यांनी साहित्य अकादमीचे उद्घाटन केले. तेव्हा ते म्हणाले होते की "दोन्ही शब्द आमचा विश्वात्मक दृष्टिकोण व आकांक्षा निर्दिष्ट करतात. एक शब्द निर्मितीचा निदर्शक तर दुसरा अभ्यासाचा प्रतीक म्हणून. ही अकादमी दोन्हींच्या उपासकांचे व्यासपीठ बनावी. तिने या क्षेत्रात कार्य करणाऱ्यांचे व धुरंधरांचे सन्मानपूर्वक गुणग्रहण करावे, निर्मितीची क्षमता असणाऱ्यांना, उदयोन्मुखांना उत्तेजन द्यावे. लोकाभिरुची संपन्न व्हावी, साहित्याचा प्रसार व्हावा व तदनुषंगाने ज्ञानाच्या कक्षा विस्ताराव्यात ही आमची अपेक्षा आहे" हा संदेश लक्षात घेऊन बोधवाक्याची निवड झाली. 'भारतीय भाषांत विविधता असली तरी हृदयाची एकता' आहे.

भारत सरकारच्या पुढाकाराने अकादमी स्थापन झाली तेव्हा पं. नेहरू, डॉ. राधाकृष्णन्, डॉ. झाकिर हुसेन, मौलाना आझाद ही धुरंधर माणसे तिची सूत्रधार होती. ही मंडळी स्वतः प्रज्ञावंत व साहित्याच्या शक्तीबद्दल नितांत आदर व प्रेम बाळगणारी होती. त्यांनी आपल्या हयातीत अकादमीची जडणघडण केली; परंपरा प्रस्थापित केल्या, संकेत रूढ केले; व मर्यादाही घालून दिल्या. सरकारी पैसा घेतला तर हस्तक्षेप टाळणे अवघड होते व खुद्द सरकारचीच संस्था असली तर तिचे स्वरूप बिघडणे अनिवार्य होते. हा भाग लक्षात घेतला, तर या मंडळींनी किती दूरदृष्टीने, शहाणपणाने व ममतेने अकादमीची जोपासना केली, हे बघितले म्हणजे मन कृतज्ञतेने भरून येते. पं. नेहरू हे मृत्यूपर्यंत अकादमीचे अध्यक्ष राहिले. ते एकदा एका सभेत मोठ्या गंभीरतापूर्वक म्हणाले की, 'अध्यक्ष या नात्याने मला भारताच्या पंतप्रधानाने माझ्या कार्यात ढवळाढवळ केलेली आवडणार नाही.' कारणे काहीही असोत, हा अभिप्राय आतापर्यंत साहित्य अकादमीच्या स्वायत्ततेचे



अनुक्रमणिका

संरक्षक कवच ठरला आहे. १९७५ साली संसदेत सर्वसाधारण कायद्यात दुरुस्तीची बाब पुढे आली होती. ती घटना घडती तर अकादमीच्याच नव्हे, तर लेखकांच्या संघटना-स्वातंत्र्यावरच कायमची कुऱ्हाड बसली असती. पण नेमके त्या वेळी पं. नेहरूंनीच वाचविले. पुन्हा तसा प्रसंग आला नाही, आता येईल असे वाटत नाही.

साहित्य अकादमीच्या कार्याचे उद्देश सांगायचे तर खालील सांगता येतील–

१) भारतातील विविध भाषांतून सातत्याने निर्माण होणाऱ्या सृजनशील व ज्ञानाधिष्ठित लेखनाची दखल घेणे, त्यांचे मूल्यमापन करणे.

२) भारतीय भाषांतील साहित्याचे परस्परात अनुवाद करून भारतीय ऐक्यभावनेला व भारतीय साहित्याला बळकटी आणणे.

३) भारतीय भाषेतील साहित्य व त्यांच्या निर्मात्यांचा अन्य भाषासमूहाला समर्पक परिचय करून देणे.

४) पाश्चात्य व अन्य भाषांतील कृतींचे व ग्रंथांचे अनुवाद करणे.

५) साहित्याच्या सुजाण जाणिवेच्या वृद्धीसाठी विविध प्रकारचे उपक्रम आखून त्या प्रक्रियेत लोकमानसाला समाविष्ट करणे.

उपरोक्त पाच उद्देश हे स्थूलमानाने सांगितले आहेत. त्यांचे कार्यक्रमात व्यावहारिक पातळीवर रूपांतर होताना कक्षा रुंद होत जातात. स्वातंत्र्याच्या उदयकाळी भारतीय पातळीवर मान्यतेसाठी व अन्य कारणांसाठी शासकीय, निमशासकीय वा सार्वजनिक अशी कुठलीच यंत्रणा नव्हती. आरंभीच साहित्य अकादमीने पुरस्काराची योजना पुरस्कृत केल्यामुळे ही उणीव भरून निघाली. भारतीय घटनांतर्गत असलेल्या १५ भाषा व अन्य प्रतिष्ठित अशा एकूण २२ भाषांचा व्यवहार समपातळीवर हाताळण्याची ही क्रिया आहे. आरंभी ही भाषासंख्या १५ अशी होती. नंतर त्यात अनेक प्रादेशिक भाषांची भर पडली. कार्यक्षमता कायम ठेवून हा पसारा सांभाळण्याची कसरत अकादमीला करावी लागत आहे.

या कार्यासाठी अकादमीची जी यंत्रणा सिद्ध झाली आहे, तिचे सूत्र असे की अकादमीचा व्यवहार हा सर्वस्वी लेखकांच्या हाती असतो. अध्यक्षाची निवड जनरल कौन्सिलच्या वतीने होते. या कौन्सिलवर साहित्य व्यवहाराशी निगडित असलेलेच लोक असतात. ही संख्या आता ८२ आहे. त्यात राज्यांचे प्रतिनिधी २२, विद्यापीठांचे २०, भारतीय भाषांचे २०, शिवाय ८ मान्यवर साहित्यिक यांचा समावेश असतो. यात सरकारनियुक्त सदस्य फक्त ६ आहेत. आतापर्यंत पं. नेहरू, डॉ. राधाकृष्णन्, डॉ. झाकिर हुसेन, डॉ. सुनीतीकुमार चटर्जी, डॉ. उमाशंकर जोशी या दिग्गजांनी अध्यक्षपद भूषविले व त्यांनीच साहित्य-अकादमीला आकार दिला. सध्या प्रा. वि. कृ. गोकाक हे अध्यक्ष आहेत.

अध्यक्षाच्या जोडीला उपाध्यक्ष असतो व तोही आतापर्यंत मान्यवर प्रतिष्ठित साहित्यिक राहत आला आहे. चिटणीस केंद्रीय खात्याने नेमलेला असला तरी तो नेमताना त्या व्यक्तीचे वाङ्मयीन कर्तृत्व महत्त्वाचे मानले गेलेले आहे. केंद्रीय मंडळाबरोबर विविध भाषांची सल्लागार मंडळे ही त्या भाषेतील मान्यवर साहित्यिकांची असतात. गेल्या तीस वर्षांच्या व्यवहारात केंद्रीय सरकारने वा अन्य कुणी सत्ताबळावर अकादमीच्या निर्णयात हस्तक्षेप केला नाही. एक-दोन प्रसंगी दडपण आणण्याचा प्रयत्न झाला. पण अकादमीने त्याला विरोध केला.

अकादमीने गेल्या तीस वर्षांत काय केले? खरे म्हणजे खूप केले. त्याचा विस्तृत ऊहापोह येथे स्थलाभावी शक्य नाही. या तीस वर्षांत अकादमीने सातत्याने प्रतिवर्षी मान्यवर साहित्यिकांना त्यांच्या विशिष्ट निर्मितीबद्दल पुरस्कार दिले हा पहिला महत्त्वाचा उपक्रम. भारतीय साहित्याची जडण-घडण अद्याप पुरेपणी व्हायचीच आहे. हे लक्षात घेऊन जे ग्रंथ सामान्यत्वे कुणी आता तयारच करणार नाही, मग प्रकाशनाचे तर सोडाच; असे सर्व भाषांतील मिळून एकूण १२५० ग्रंथ अकादमीने प्रकाशित केले आहेत. त्यात भारतीय आणि परदेशीय कलाकृतींचे अनुवाद समाविष्ट आहेत. त्याशिवाय विविध भाषांतील– अगदी आरंभापासूनच्या मान्यवर साहित्यिकांचे वाङ्मयीन जीवन अन्य भारतीय रसिकांना कळावे म्हणून 'भारतीय साहित्याचे मानदंड' (M.I.L.) अशी माला यशस्वीपणे चालवली आहे. या मालेत एकूण १२० ग्रंथ अकादमीने प्रकाशित केले आहेत. मराठीपुरते लिहावयाचे झाल्यास ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम, केशवसुत, दत्त कवी, श्री. कृ. कोल्हटकर इ. नावे वानगीदाखल सांगता येतील. याशिवाय अकादमीने निरनिराळ्या लेखकांचे, विषयांचे संग्रह, संपादने प्रकाशित केली आहेत. लेखकांना प्रवासासाठी

तसेच एखाद्या साहित्यिक व त्याच्या साहित्याच्या अभ्यासासाठी होतकरू तरुणांना अनुदान दिले आहे. स्मरणपूर्वक अनेक मोठ्या मंडळींचे शताब्दी उत्सव साजरे केले आहेत.

याशिवाय उल्लेखनीय कार्य म्हणजे आंतरराष्ट्रीय पातळीवरील सेमिनार. पहिला सेमिनार १९६१ साली रवींद्रनाथ टागोर शताब्दीमहोत्सवाच्या निमित्ताने आयोजित केलेला. त्यात जगातील १६ देशांतून २५ मंडळी— आल्डस् हक्सलेसारखी नामवंत— व भारतातील ४० मंडळी सहभागी झाली होती. दुसरा १९६४ साली शेक्सपीअरसंबंधीचा. दोन सेमिनार रामायणाच्या संदर्भात झाले. १९७४-७५ व १९८१. पहिला संत तुलसीदासांच्या रामचरित्रमानसाच्या उत्सवाच्या संदर्भात होता. त्यात परदेशातील १५ मंडळी व भारतातील ३० विद्वानांनी भाग घेतला होता. त्यात एकूण ४४ निबंध वाचले गेले व ते ग्रंथरूपाने प्रकाशित झाले. दुसऱ्या सेमिनारसाठी बाहेरून आलेल्यांची संख्या १५ होती. यातीलही निबंध ग्रंथरूपाने प्रकाशित झाले आहेत. याशिवाय १९८१ साली मुनशी प्रेमचंद व नंतर सुब्रह्मण्यम् भारती हे विशेष उल्लेखनीय सेमिनार. त्याला इतर देशांतील १४ विद्वान उपस्थित होते. हे झाले आंतरराष्ट्रीय पातळीवरील कार्यक्रम. राष्ट्रीय पातळीवर आतापर्यंत ३५० सेमिनार व चर्चासत्रे घेतली गेली. प्रादेशिक पातळीवर अनेक उपक्रम योजनापूर्वक घेतले आहेत. गेली २८ वर्षे Indian Literature हे इंग्रजी द्वैमासिक व 'समकालीन भारतीय साहित्य' हे हिंदी द्वैमासिक १९८० पासून अकादमीने चालवले आहे. भारतीय लेखकांचा 'हुज हू' नामक संदर्भकोश सिद्ध करून प्रकाशित केला आहे. भारतीय साहित्यकोश पूर्ण करीत आणला आहे. त्यात १२००० नोंदींच्या रूपाने लेखकांची, ग्रंथांची माहिती वाचकांना चटकन इंग्रजीत उपलब्ध होईल. याखेरीज पुस्तक-प्रदर्शने इ. छोट्या-मोठ्या बाबी आहेतच. आरंभी साहित्य अकादमीचे अंदाजपत्रक फक्त १ लाख ६ हजारांचे होते. आज ते ५६ लाखांचे झाले आहे. पुस्तकांच्या विक्रीचे प्रमाण ६० टक्के आहे. भारतातील एकूणच पुस्तकांच्या खरेदी-विक्रीचा व्यवहार व त्यामागचे मानसशास्त्र लक्षात घेता ही मजल मोठीच म्हणावी लागते.

अकादमीच्या कार्याची ही अतिसंक्षिप्त नोंद. जोपर्यंत मराठीचा संबंध आहे, तोपर्यंत हा जमाखर्च जरा निराळ्या पद्धतीने मांडावा लागतो. सामान्य मराठी वाचकांचा व साहित्य अकादमीचा संबंध येतो वर्षातून एकदा—पारितोषिक जाहीर झाले की. वास्तविक पारितोषिक आहे म्हणून द्यावे असे घडत नसते. शिवाय ते देण्याची प्रक्रियाही मोठी गुंतागुंतीची असते. या पुरस्कारासाठी कुणी अर्ज करावयाचा नसतो व पुस्तकही पाठवायचे नसते. हा सगळा व्यवहार गोपनीय असतो. तसाच अनेक प्रक्रियांचा. यात तीन वेगवेगळ्या चाळण्या असतात. किमान ८० ते १०० लोकांच्या संमतीशिवाय एखाद्या पुस्तकाला पारितोषिक मिळू शकत नाही. अशा अनेक भाषा आहेत की त्यांना गेल्या तीस वर्षात अनेक वर्षी पारितोषिके मिळाली नाहीत. तेलगूला ६६ ते ६८ सतत तीन वर्षे व एकूणच ७ वर्षे पारितोषिक मिळाले नाही. आसामी ९ वर्षे, सिंधी ८, पंजाबी व उर्दू ६, तामिळ ५, गुजराती, मल्याळम् ४, बंगाली ३, कन्नड २, हिंदी १ अशी अनेक भाषांची वर्षे पारितोषिकाविना कोरडी गेली. मराठीला मात्र १९५७ हे एक वर्ष वगळता सातत्याने हे पारितोषिक मिळाले आहे. ही योजना १९५४-५५ पासून आरंभ झाली ती आजपर्यंत अव्याहत चालू आहे. पारितोषिकाची रक्कम आरंभी ५००० रु. होती. आता ती १०००० रु. आहे. अर्थात् रकमेपेक्षा या पारितोषिकाने मिळणारी अखिल भारतीय मान्यता महत्त्वाची.

हे पारितोषिक मिळण्याच्या मागे व पुढे बरीच चर्चा होते. क्वचित् वादळही होते. अखिल भारतीय पातळीवर या पारितोषिकांनी वाङ्मयीन प्रश्न २।३ वेळाच उपस्थित केले. एक तेलुगूत नार्लां यांच्या वेळी (१९८१), दुसरा डोग्रीत पारितोषिक नाकारल्याच्या निमित्ताने (१९८२), व १९८३ गुजरातीच्या संदर्भात. मराठीत अलीकडे 'सत्तांतरा'च्या निमित्ताने बरेच वादळ उठविण्यात आले. त्यात व्यक्तिगत टीकेचे प्रमाण निष्कारण अधिक आल्यामुळे त्याची तटस्थपणे दखल घेणे अवघड झाले. १९७३ ला 'काजळमाया'च्या निमित्ताने थोडा वाद झाला, पण तो मुळातच तांत्रिक बाबींसंबंधीचा होता. असे काही प्रकार वगळले तर या पारितोषिकप्राप्त व्यक्तींची व कलाकृतींची निवड ही लोकादरास व प्रशंसेस पात्र झाली आहे.

पारितोषिकप्राप्त कलाकृतीचे भाषांतर अकादमीने करावे असा काही संकेत नाही. पण खांडेकरांच्या 'ययाती'चा एक अपवाद वगळला तर अन्य कुणा लेखकाच्या

कलाकृतीला भाषांतराचा व लोकमान्यतेचा एवढा मान मिळाला नाही. काही अंशी युगान्त, स्वामी, नटसम्राट, उपरा यांची भाषांतरे काही भाषांत झाली. पण कन्नड, मल्याळम, बंगाली, हिंदी, उर्दू व अन्य काही भाषांतील पुस्तकांची हिंदीद्वारा अन्य भारतीय भाषात सौकर्याने भाषांतरे पाहावयास मिळतात, ती लोकप्रिय झालेली आढळतात. ही घटना मोठी सूचक, अर्थपूर्ण व काही अशी चिंता निर्माण करणारी आहे. वाङ्मयीन प्रक्रियेला अकादमी तरी एका मर्यादेपर्यंत हातभार लावील. पुढची काळजी साहित्यिकांनी, समाजाने घ्यावी. आमची मराठी मंडळी ही अन्य भाषासंपर्काच्या बाबतीत खूपच उदासीन आहेत. हेच या निमित्ताने गेल्या तीस वर्षांत सिद्ध झाले आहे.

या उदासीनतेवर नेटाने मात करण्याचा प्रयत्न स्वत: अकादमीनेच केला. मराठी साहित्याचा इंग्रजीतून इतिहास हे बराच काळ वाट पाहत असलेले प्रकरण मार्गी लागले आहे. पण त्यातही प्रश्न असा पुढे आला की मराठी साहित्य, साहित्यिक व महाराष्ट्र यासंबंधी अन्य भाषांत व इंग्रजीत इतकी तुटपुंजी माहिती का ? या बाबतीत दक्षिण भारतीय भाषांचे उदाहरण अनुकरणीय आहे. मराठीत मुळात सगळे व्यवस्थित आहे हे मान्य करायचे जरी ठरविले तरी आजच्या आधुनिकतेच्या व संपर्काच्या काळात ही उणीव डाचणारी व बोचणारी आहे. आता अकादमीनेच गडकरी व केतकर यांच्यावर ग्रंथ लिहिण्याची योजना मार्गी लावली आहे. पण इतर लेखकांचे व चळवळींचे काय ? जोपर्यंत अन्य भाषांतून पुस्तके अनुवादित करण्याचा प्रश्न आहे; तोपर्यंत अकादमीने असे ४० ग्रंथ आतापर्यंत मराठीत प्रकाशित केले आहेत, तसेच मान्यवर दिवंगत लेखकांचे ग्रंथही निवडक रूपात संपादित करून प्रकाशित केल्याची संख्याही जवळपास तेवढीच आहे. काही महत्त्वाच्या प्रकाशनाला हातभार लावला आहे. उदा. केतकरांच्या प्राचीन महाराष्ट्राच्या दुसऱ्या खंडाचे प्रकाशन. वाङ्मयीन दृष्टीने ज्ञानाची मूलभूत साधने, मौल्यवान पुस्तके, नफ्यातोट्याचा विचार न करता अकादमीने तयार करण्यात, करविण्यात, प्रकाशित करण्यात तत्परता दाखवली आहे. प्रसंगविशेषी संबंधित लेखकांच्या वृत्ती, प्रवृत्ती, आळस सोसूनही केवळ वाङ्मयीन व सांस्कृतिक दृष्टीने काम कसे पूर्ण होईल ते पाहिले. उपलब्ध संधीचा, साधनांचा चांगला उपयोग करून घ्यावयाचा तर यापेक्षाही अकादमी या संस्थेचा मराठी साहित्याभिवृद्धीला उपयोग होऊ शकेल. त्यासाठी साहित्य अकादमीचे धोरण आडवे येत नाही, किंवा पैसा कमी पडत नाही. प्रश्न फक्त नेटाने काम करण्याचा आहे, तसाच तो विचार-विनिमयाने व सहकार्याने करण्याचा आहे.

पारितोषिके, ग्रंथनिर्मिती, प्रकाशने हा अकादमीच्या कार्याचा एक भाग. आरंभापासूनच वाङ्मयीन व्यवहारात समाजाला समाविष्ट करून घेण्याचे तत्त्व अंतर्भूत आहेत. ह्यासाठी वेळोवेळी शताब्दी उत्सवाच्या निमित्ताने, वा अन्य निमित्ते लेखकांचे मेळावे, परिसंवाद, चर्चासत्रेही अकादमीने सातत्याने आयोजित केली. केतकर, गडकरी, रामदास, शिवराम कारंत यावरची चर्चासत्रे ही अलीकडची उदाहरणे. हैदराबादेत त्रैभाषिक वाङ्मयीन नियतकालिकासंबंधी चर्चासत्र हे एक महत्त्वाचे उदाहरण. साहित्यात रुची असणाऱ्यांना अगत्याने एकत्र बोलवायचे, संवाद साधायचा व त्यातून समाजात एक वातावरण निर्माण करावयाचे व टिकवायचे हा त्यामागचा प्रधान उद्देश. श्री. कारंतवरील चर्चासत्र त्यादृष्टीने मोठे उद्बोधक झाले. हे उपक्रम आणखी वाढावेत अशी मागणी असू शकेल. पण शेवटी अकादमीच्या काही मर्यादा आहेत. त्या मर्यादांचे अकादमीला भान आहे. ते म्हणजे अकादमीसाठी काम करणारी मंडळी ही साहित्य प्रेमापोटी एकत्र येतात. अकादमीच्या व्यास-पीठावर त्यांच्यासाठी तो अनेक वेळा प्रासंगिक वा नैमित्तिक व्यवहार ठरतो. ही मर्यादा एका बाजूला व सार्वत्रिक उदासीनता दुसऱ्या बाजूला. यातून मार्ग काढायचा व तोल सांभाळायचा असतो. हा खेळ केवळ पैशाचा नाही. हे पूर्वी सांगितलेच आहे. ही एक सांस्कृतिक चळवळ आहे. आपल्या आजच्या अवस्थेचे मूल्य-मापन त्यासाठी आवश्यक आहे. या अवस्थेला अखिल भारतीय संदर्भ आहेच, पण तो लक्षात घ्यायचा आहे. अकादमीच्या मराठी प्रकाशनांची विक्री इतर भाषिकांच्या तुलनेने फारच मंद आहे, हीही एक चिंतेची बाब आहे. अकादमी हा सगळा व्यवहार निर्विवादपणे व्यापारी वृत्तीने करीत नसली तरी समाजाची जबाबदारी त्यामुळे संपत नाही. अकादमी जे देते ते विविध स्वरूपाचे, वेग-वेगळ्या धाटणीचे; त्यामुळे रूढ रंजनाच्या गरजांशी ते मेळ खात नसले तरी सुजाण वाचकाला आता अधिक जागरूक व्हावे लागेल; व त्याला जागे ठेवण्यासाठी अनेकांना कार्यशील राहावे लागेल.

साहित्य अकादमीच्या योजनेत ज्येष्ठ व श्रेष्ठ लेखकाला सन्मानित करण्यासाठी फेलोशिप ही महत्त्वाची योजना आहे. हा मान मोजक्या व निवडक व्यक्तींनाच मिळू शकतो. त्यांची संख्याही अकादमीच्या घटनेने निश्चित केली आहे. फ्रेंच अकादमीत काही ठराविकच लोक असत; पण तो मान मिळण्याची आकांक्षा धरीत. त्याच धर्तीवर ही योजना. आतापर्यंत राष्ट्रीय पातळीवर फक्त २३ जणांना हे सन्मान देण्यात आले. त्यातील ११ जण हयात आहेत. महाराष्ट्रापुरता हा मान खांडेकर, अनिल व डॉ. मिराशी यांना मिळाला. काकासाहेब कालेलकर, द. रा. बेंद्रे हेही या मानसन्मानाचे अधिकारी होते.

या फेलोशिपबरोबर साहाय्यक फेलोशिपची तरतूद घटनेने केली आहे. पण तिचा वापर गेल्या ३० वर्षांत फारसा झाला नाही. हे मान स्वस्त होऊ नयेत हा यामागचा दृष्टिकोन अकादमीने ठेवला आहे. ज्ञान व साहित्यक्षेत्रात अविच्छिन्न काळपर्यंत दीर्घसेवा व मौलिक योगदान हे निर्णायक घटक त्यासाठी प्रमाण आहेत. आतापर्यंत त्यावर तडजोड झाली नाही किंवा ज्यांना मान मिळाले त्यासंबंधी विरोधी सूर निघाला नाही.

साहित्य अकादमीने तीन खंडात भारतीय लेखकांची विस्तृत सूची तयार केली आहे, आणि ती परस्पर माहितीसाठी निश्चितपणे उपयुक्त ठरली आहे. सूचीबरोबरच Who's Who हा ग्रंथही निघाला आहे. अशा स्वरुपाची कार्ये अंतिमतः त्या त्या भाषेतील मंडळीच करतात हे खरे असले तरी अशा योजना आखून त्या कार्यान्वित करणे महत्त्वाचे. तशीच त्यातील वैगुण्ये कमी होऊन त्याची उपयुक्तता वाढविणे, त्यासाठी दक्षता घेणे ही त्या त्या मंडळींची जबाबदारी.

साहित्य अकादमीचे कार्य व कार्यक्षेत्र जसजसे रुंदावत गेले तसतशी आंतरराष्ट्रीय पातळीवर भारतीय साहित्य व साहित्यिकांची प्रातिनिधिक संस्था म्हणून तिची प्रतिष्ठा, मान्यता वाढली. युनेस्कोशी सहकार्य व साहचर्य वाढले. या देवाण-घेवाणीचा भारतीय साहित्याला विविध प्रकारे लाभ झाला.

अकादमीच्या व्यवहाराबाबत कुणी अकारण असंतुष्ट असण्याचे कारण नाही. किंबहुना अकादमीने संधी उपलब्ध करून दिली, परंतु तिचा आपण लाभ घेऊ शकलो का ? शकतो का ? हाच माझ्या दृष्टीने मुख्य व मध्यवर्ती प्रश्न आहे. उदा. साहित्य अकादमीने गेल्या तीस वर्षांपासून Indian Literature हे मासिक इंग्रजीतून व ६ वर्षांपासून 'समकालीन साहित्य' हे हिंदीतून सातत्याने चालविले आहे. मराठीतील चांगले साहित्य अन्य भाषिकांसमोर मांडण्याची ही एक संधी, आपला विचार चर्चारूपाने प्रगट करण्याचे व्यासपीठ. भारतीय साहित्यक्षेत्रात पुढाकार घेऊन आपला दृष्टिकोन इतरांना सांगण्याची व इतरांचा समजून घेण्याच्या या सोयीचा आपण किती लाभ घेतला; या बाबीचा अंतर्मुख होऊन विचार करण्याची वेळ आली आहे. त्यासंबंधी अधिक तपशीलात जाणे स्थलाभावी व वेळेअभावी शक्य झाले नाही. पण भावी कार्याच्या संदर्भात या बाबतीत चर्चा व्हायला हवी. त्यातून निष्पन्न होणारे निष्कर्ष जे काही असतील त्याच्या संदर्भात भावी अपेक्षांचा विचार महाराष्ट्राने करावयाचा आहे; नव्हे करावा.

→

## साभार स्वीकार

### कथा

**विश्वकर्म्यांचे विश्व** : सुरेश मथुरे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. ४० △ **जगू** : रोहिणी मानकामे; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; १९८५; रु. ६ △ **इजारी बेलपानं** : प्रतिमा इंगोले; समाज प्रबोधन संस्था, पुणे ३०; १९८५; रु. ५ △ **दूरदेशीच्या गोष्टी** : अजिता काळे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ४०



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मण्डळ

## रचना आणि कार्य

(महाराष्ट्रराज्य स्थापनेनंतर साहित्य संस्कृती मंडळाची स्थापना होऊन निश्चित झालेले त्याचे स्वरूप पुढे दिले आहे.)

### प्रास्ताविक

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर, मराठी भाषा व साहित्य यांचा सर्वांगीण विकास करून त्यांना समृद्ध करणे व साहित्य, इतिहास व कला या क्षेत्रांतील महाराष्ट्राचा थोर वारसा जतन करणे या उद्देशाने महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची दिनांक १९ नोव्हेंबर १९६० ला स्थापना करण्यात आली. आधुनिक शास्त्र, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत, त्याचप्रमाणे प्राचीन भारतीय संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा मुख्य उद्देश लक्षात ठेवून मंडळाने आपला वाङ्मयीन कार्यक्रम आखला आहे व तो व्यवस्थित रीतीने कार्यवाहीत आणला जात आहे.

### उद्दिष्टे व जबाबदाऱ्या

दिनांक १९ नोव्हेंबर १९६० च्या ज्या शासकीय ठरावान्वये मंडळाची प्रथम स्थापना झाली व त्या ठरावानुसारच शासनाने मंडळाकडे खालील उद्दिष्टे, व जबाबदाऱ्या सोपविल्या आहेत—

(१) महाराष्ट्राचे साहित्य, संस्कृती व इतिहास या क्षेत्रांतील संशोधनांचे प्रकल्प वा योजना यांच्या पूर्ततेसाठी चालना देणे, मदत करणे वा अशा योजना मंडळाने स्वतः हाती घेणे.

(२) असल्या संशोधनांचे मराठीतून प्रकाशन करण्यासाठी चालना देणे, मदत करणे वा मंडळाने स्वतः प्रकाशित करणे.

(३) स्वतंत्र व विद्वद्मान्य प्रबंध, व्याप्तिलेख, ग्रंथ, नियतकालिके त्याचप्रमाणे ज्ञानविज्ञानाच्या कोणत्याही शाखेतील कोणत्याही अन्य लेखनाचे मराठीतून प्रकाशन करण्यासाठी चालना देणे, मदत करणे व मंडळाने ते स्वतः प्रसिद्ध करणे.

(४) संदर्भकोश, ज्ञानकोश, शब्दकोश इत्यादी संदर्भसाहित्याचे मराठीतून प्रकाशन करणाऱ्या योजनांना चालना देणे, मदत करणे वा मंडळाने त्या स्वतः कार्यान्वित करणे.

(५) साहित्य अकादमीने आधीच भाषांतरासाठी हाती घेतलेले ग्रंथ वगळून मराठीतर भारतीय व परदेशी भाषा यातील अन्य उत्कृष्ट ग्रंथांची मराठीत भाषांतरे करून घेणे व ती प्रसिद्ध करणे. तसेच, अशा भाषांतरांच्या योजनांस चालना देणे व मदत करणे.

(६) महाराष्ट्राचा इतिहास व संस्कृती यांची प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे आधारभूत अशी महत्त्वाची प्रकाशित वा अप्रकाशित साधनसामग्री (कागदपत्रे) संपादित करणे, मराठीत भाषांतरित करणे व प्रसिद्ध करणे आणि अशा योजनांना चालना देणे, मदत करणे वा त्या योजना स्वतः कार्यान्वित करणे.

(७) महाराष्ट्राच्या सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक व वाङ्मयीन इतिहासाचे संपादन व प्रकाशन करण्याबाबतच्या योजनांस चालना देणे, मदत करणे वा असल्या योजना स्वतः कार्यान्वित करणे.

(८) मराठी साहित्याच्या अभिवृद्धीच्या दृष्टीने ज्ञानविज्ञानाच्या कोणत्याही शाखांत संशोधनार्थ नवनवीन मार्गाचा शोध घेणे व पाहणी करणे.

(९) त्याचप्रमाणे, या क्षेत्रात खुद्द मंडळाने तसेच अन्य खाजगी संस्था वा विद्वान यांनी मंडळाच्या अनुदानाने वा अन्यथा, हाती घेतलेल्या निरनिराळ्या वाङ्मयीन कार्याच्या अद्यावत प्रगतीबाबत शासनास वेळोवेळी माहिती पुरविणे.

(१०) इतिहासविषयक संशोधन व साहित्याची अभिवृद्धी याबाबत शासकीय धोरण आखण्यासाठी शासनास मदत करणे.

...२

### वाङ्मयीन कार्यक्रम

वरील परिच्छेदात शासनाने मंडळाकडे सोपविलेली उद्दिष्टे साध्य करण्यासाठी आधुनिक महाराष्ट्राच्या वाङ्मयीन गरजा लक्षात घेऊन सुरुवातीपासूनच मंडळाने मौलिक व बहुविध वाङ्मयीन कार्यक्रम आखला असून ज्ञान आणि संस्कृतीच्या विकासाचे साधनस्वरूप व आधुनिक विज्ञान व तंत्र यातील अद्ययावत प्रगतीची माहिती देणारी अशी मूलभूत ज्ञान देणारी पुस्तके व अभिजात ग्रंथांची भाषांतरे स्वस्त किंमतीत मराठी वाचकांना उपलब्ध करून देण्यावर आपले लक्ष केंद्रित केले आहे. याच दिशेने मंडळाने, सुरुवातीपासून खालील महत्त्वाचा वाङ्मयीन कार्यक्रम कार्यवाहीत आणला आहे–

#### (१) मराठी विश्वकोशाची रचना

मानव्यविद्या, विज्ञान व तंत्रविद्या यातील सर्व विषयांचे अद्ययावत ज्ञान संकलित करणाऱ्या प्रत्येकी १००० पृष्ठांचे वीस खंडात संपादन व प्रकाशन.

#### (२) महाराष्ट्राचा इतिहास

इतिहासपूर्व कालापासून अर्वाचीन कालापर्यंत (राजकीय त्याचप्रमाणे सामाजिक व सांस्कृतिक इतिहासाचे) प्रत्येकी ५०० पृष्ठांचे पाच खंडात प्रकाशन.

#### (३) मराठी बोलभाषांचा अभ्यास

आधुनिक भाषाशास्त्रीय विश्लेषणात्मक ऐतिहासिक संदर्भ पद्धतीने महाराष्ट्रातील बोलभाषांचा अभ्यास व प्रकाशन.

#### (४) आंतरभारती–विश्वभारती

मराठी भाषिकांसाठी मराठीतर भारतीय व परदेशी भाषांचा अभ्यास करण्याची साधने. द्विभाषिक शब्दकोश, भाषा प्रवेश व साहित्य परिचय या स्वरूपात तयार करणे.

#### (५) शास्त्रीय ग्रंथमाला

भौतिकशास्त्रे, तंत्र, सामाजिक शास्त्रे, मानव्यविद्या इत्यादी क्षेत्रातील विषयांवर विद्यापीठीय दर्जाच्या ग्रंथांचे सामान्य सुशिक्षित वाचकांसाठी मराठीतून प्रकाशन.

#### (६) उत्कृष्ट अभिजात ग्रंथांच्या भाषांतराची योजना

संस्कृत, मराठीतर भारतीय भाषा व परदेशी भाषा यातील उत्कृष्ट व अभिजात ग्रंथांच्या मराठी भाषांतराचे प्रकाशन.

#### (७) प्रकाशन अनुदान योजना

निरनिराळ्या विषयांवरील उत्कृष्ट ग्रंथांच्या प्रकाशनासाठी लेखक, संशोधन व साहित्यिक संस्था यांना अनुदान देणे.

#### (८) ललितकलाविषयक संशोधन व प्रकाशनाची योजना

कला व कलासंवद्ध विषयांवर मूलभूत संशोधनात्मक, परीक्षणात्मक व टीकात्मक ग्रंथ, कलासंवद्ध जुन्या प्रमाणभूत ग्रंथांची भाषांतरे, विविध ललित कलांचा इतिहास व कलाकारांची चरित्रे इत्यादी वाङ्मयाचे प्रकाशन.

#### (९) मराठी वाङ्मयकोशाचे संपादन व प्रकाशन

मराठी भाषा आणि साहित्य-उद्‌गम, विकास व इतिहास, साहित्यिक प्रमेये, साहित्य प्रकार व साहित्यसमीक्षा–प्राचीन व अर्वाचीन मराठी साहित्य व साहित्यिक इत्यादी विषयांवर चार खंडांत (पृष्ठे २५००) संपादन व प्रकाशन.

#### (१०) मराठी महाकोशाचे संपादन व प्रकाशन

शब्दांची उगमस्थाने, वर्गीकरण, विश्लेषण, मूलभूत तत्त्वे, ध्वनी व अर्थ, वाक्प्रचार, भाषिक पृथ:-करण, ऐतिहासिक व तुलनात्मक भाषिक अभ्यास– या पद्धतीने मराठीतील जवळ जवळ एक लाख शब्दांच्या सचित्र कोशाचे चार खंडात संपादन व प्रकाशन.

#### (११) प्राचीन ग्रंथमाला

१९ व्या शतकात व २० व्या शतकाच्या पहिल्या दोन दशकात प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या व सध्या अनुपलब्ध असलेल्या मराठी साहित्याचे पुन:प्रकाशन.

म. श्री. दीक्षित

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

महाराष्ट्र साहित्य परिषद ही मराठी भाषिक जनतेची सर्वात जुनी आणि प्रातिनिधिक साहित्यसंस्था. परिषदेच्या स्थापनेला २७ मे १९८६ रोजी ऐंशी वर्षे पूर्ण झाल्यामुळे तिचा ८० वा वर्धापनदिन साजरा करण्यात आला. या निमित्ताने परिषदेची वाटचाल गेल्या ८० वर्षांत कशी झाली याचे एक धावते दर्शन घडविणे प्रसंगोचित होईल.

## ग्रंथकार संमेलने

परिषदेची स्थापना १९०६ च्या मे महिन्यात झाली असली तरी त्या स्थापनेची पाळेमुळे न्यायमूर्ती रानडे आणि लोकहितवादी यांनी १८७८ पासून ग्रंथकार-संमेलने भरविण्याची जी चळवळ सुरू केली त्या चळवळीशी निगडित आहेत. जे रोपटे १९०६ साली अंकुरित झाले, त्या रोपटयाच्या भूमीची मशागत वरील दोघा समाजधुरीणांनी केली, हे सर्वप्रथम कृतज्ञतापूर्वक नमूद केले पाहिजे. पुणे येथील १८७८ आणि १८८५ची दोन ग्रंथकार-संमेलने आणि त्यानंतर वीस वर्षांचा खंड पडून, १९०५ साली सातान्यास भरलेले संमेलन, ही तीन संमेलने न भरती तर १९०६ मधील पुण्याचे संमेलन (की ज्यात परिषद स्थापना झाली) भरले असते की नाही कुणास ठाऊक! बहुधा भरले नसते. पण अखेर संस्था म्हटली की, काही ध्येयवादी, तळमळीच्या व्यक्तीच असतात, आणि अशा व्यक्तींच्या उत्साहामुळे संस्थात्मक जीवनाचा प्रवाह वाहता राहतो. साहित्य परिषद स्थापन झाली ती मुख्यतः अशाच काही निरलस कार्यकर्त्यांमुळे. चार ग्रंथकार-संमेलने अधुनमधून मोजक्या उपस्थितीत दिवाणखान्यातून कशीबशी भरली व त्यामधून केवळ काव्यशास्त्र-विनोदात चार घटका गेल्या. मेळाव्यापलीकडे रचनात्मक कार्य काहीच घडू शकले नव्हते. ते घडावे आणि भाषणे-चर्चा-सूचना वाऱ्यावर उडून जाऊ नयेत. यासाठी एखाद्या मध्यवर्ती स्थिर साहित्यसंस्थेची आवश्यकता काही व्यक्तींना जाणवू लागली. परिषदेचा जन्म अखेर या जाणिवेतून झाला.

## प्रबोधन युगाचे गोमटे फळ

ग्रंथकार-संमेलने (भावी काळातील साहित्यसंमेलने) आणि साहित्य परिषद यांचा जन्म पुण्यात व्हावा याचे एक सरळ स्पष्ट कारण म्हणजे अव्वल इंग्रजी काळात पुण्या-मुंबईत झालेल्या विविध शैक्षणिक नि सामाजिक चळवळी हे होय. जांभेकर, भाऊ महाजन, भाऊ दाजी, दादोबा, लोकहितवादी, रानडे, फुले, विष्णुशास्त्री पंडित, विष्णुबोवा ब्रह्मचारी, चिपळूणकर, आगरकर, टिळक, भांडारकर इत्यादींच्या कर्तृत्वामुळे प्रबोधनाचे जे नवयुग महाराष्ट्रात सुरू झाले. त्या युगाला आलेले एक गोमटे फळ म्हणजे साहित्य परिषद असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. संस्था जन्मास येते ती सहजासहजी नाही, तर तिला काही एक पार्श्वभूमी लागते आणि अनेक व्यक्तींचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष हातभार लागावा लागतो. परिषदेच्या जन्माची त्रोटक पार्श्वभूमी ही अशी आहे.

१९०६ सालचे ग्रंथकार–संमेलन पुण्यात मे महिन्यात २६ व २७ (शनिवार व रविवार) रोजी भरले ते सदाशिव पेठेतील मळेकर वाड्यात. नागनाथपारा-नजीकच्या परिसरातील हा मळेकरवाडा म्हणजे बुधगावकर पटवर्धन संस्थानिकांची वास्तू होती. या मळेकरवाड्याच्या दिवाणखान्यात संमेलन दोन दिवस भरले होते. अध्यक्ष होते...रावसाहेब गोविंद वासुदेव कानिटकर, (जुन्या लेखिका काशीबाई कानिटकर यांचे पती,) उपस्थितांचा मेळावा... चिंतामणराव वैद्य, वि. का. राजवाडे, विजापूरकर, पांगारकर, ना. कृ. गद्रे, हरिभाऊ आपटे, वा. गो. आपटे, वि. ल. भावे, कृष्णाजीपंत खाडिलकर, न. चिं.

केळकर, वा. गं. टिळक इत्यादींनी खऱ्या अर्थाने सुशोभित केला होता. कै. दत्तोपंत पोतदार राजवाड्यांचे वोट धरून संमेलनाला प्रथम उपस्थित राहिले ते याच प्रसंगी. रविवार दि. २७ मे रोजी सायंकाळी 'महाराष्ट्र साहित्य परिषद' स्थापन झाल्याची घोषणा हे प्रस्तुत संमेलनाचे खरेखुरे फलित म्हणता येईल. परिषद स्थापन झाल्याची, तिला ६० सभासद लाभल्याची आणि वा. गो. आपटे, वि, ल. भावे, कृ. प्र. खाडिलकर हे तिघे तिचे सेक्रेटरी (चिटणीस) नेमल्याचे न. चि. केळकरांनी घोषित करताच टिळकांसह सर्वांनी या घोषणेचे सहर्ष स्वागत केले. या विधायक आनंददायी घटनेचे स्वागत करताना लो. टिळकांनी काढलेले उद्‌गार कार्यकर्त्यांनी मनावर कोरून ठेवावेत असे आहेत...

"केवळ उत्कट इच्छेने कामे होत नसतात,
तर कर्ते पुरुष पुढे यावे लागतात"

सुदैव असे की, कर्त्या पुरुषांची एक परंपरा परिषदेला भावी काळात अधूनमधून लाभत गेली आणि त्यांच्या कर्तृत्वामुळेच ऐंशी वर्षांची तिची वाटचाल चालू आहे, चालत राहणार आहे'

## मराठी साहित्याची पंढरी

साहित्यसंमेलने आणि साहित्य परिषद यांचे नाते १९०६ साली जे एकदा जुळले ते १९६४ च्या मडगाव संमेलनापर्यंत अतूट राहिले. १९०७ ते १९६४ या सत्तावन्न वर्षांच्या काळात परिषदेने ४१ साहित्यसंमेलने भरविली आणि महाराष्ट्रात, तसेच बृहन्महाराष्ट्रात मराठी साहित्यप्रेमी जनतेला एकत्र आणून भावनिक ऐक्याचे फार मोठे कार्य केले. संमेलनाच्या रूपाने मराठी साहित्याची पंढरी निर्माण करण्याचे परिषदेचे हे कार्य सर्वाधिक महत्त्वाचे आहे. मराठी माध्यम, भाषिक विद्यापीठांची निर्मिती, परिभाषा, शुद्धलेखन, सीमाप्रश्न आणि संयुक्त महाराष्ट्राची स्थापना या सर्व चळवळींचे उगमस्थान म्हणजे परिषदेने भरविलेल्या साहित्य-संमेलनांचे व्यासपीठ, हा इतिहास आहे आणि म्हणूनच तिचे हे कार्य ऐतिहासिक म्हटले पाहिजे. १९०६ नंतरची दोन संमेलने लागोपाठ पुण्यालाच भरली. १९०७ चे पाचवे पुन्हा मळेकरवाड्यात, तर १९०८ चे सहावे विजयानंद नाट्यगृहात. पाचव्यात साहित्य परिषदेच्या कार्याचा तुटपुंजा अहवाल सादर होण्यापलीकडे फारसे काही झाले नाही. पण सहाव्या संमेलनात त्रिवर्ग चिटणीसांनी परिषदेच्या रचनानियमांच्या मसुद्यांची चर्चा करून तिला कार्यक्षम करण्याची थोडी हालचाल केली. सभासदसंख्या या वेळी ६० वरून ९० वर गेल्याचे सांगण्यात आले. ७ वे १९०९ चे संमेलन बडोद्यास भरले. या संमेलनात परिषदेच्या नियमांचा फक्त मसुदा मांडण्यात आला. वंगीय साहित्य परिषदेच्या धर्तीवर वा. गो. आपटे यांनी तो तयार केला होता. यानंतर संमेलनाने तीड वर्षे दडी मारून १९१२ साली अकोला येथे पुनरपि जोरदार उडी मारली. हे संमेलन भरविण्यात पुढाकार होता...रावसाहेब विष्णु मोरेश्वर महाजनी यांचा आणि अध्यक्षपदी होते कादंबरीकार...हरिभाऊ आपटे.

## पहिले कार्यकारी मंडळ

परिषदेच्या भावी वाटचालीच्या दृष्टीने अकोला संमेलन चिरस्मरणीय ठरले. कारण याच संमेलनात परिषदेचे घटनानियम मान्य होऊन पहिले कार्यकारी मंडळ घोषित करण्यात आले नि तिचे घटनात्मक कार्य सुरू झाले. वा. गो. आपटे आणि महाजनी या दोघांच्या मुख्यतः प्रयत्नाने परिषदेचा पाया रचला गेला आणि नंतर मुंबई येथे फणसवाडीत 'विविधज्ञान-विस्तारा'च्या कचेरीत तिची छोटी कचेरी थाटली गेली. आपटे, खाडिलकर आणि भावे या तिघांऐवजी घटनेनुसार आपटे यांच्या जोडीला रावसाहेब मोरमकर हे चिटणीस झाले. रावसाहेब महाजनी (अध्यक्ष), त्यांचे आप्त दा. ग. पाध्ये (उपाध्यक्ष), त्यांच्या जोडीला पुन्हा सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर असा एकूण पंचवीस-सव्वीस मातबर व्यक्तींचा संच परिषदेचे पालनपोषण करू लागला.

परिषदेचा १९४२ पर्यंतचा सर्वांगीण इतिहास (ले. कै. दत्तो वामन पोतदार), त्या इतिहासाची १९७० पर्यंतची सुधारित द्वितीयावृत्ती (ले. कै. श्री. शं नवरे), तसेच अमृतमहोत्सवी स्मरणिकेत (१९८१) श्री. म. श्री. दीक्षित यांनी लिहिलेली त्या काळापर्यंतची तपशीलवार माहिती प्रकाशित झाली असल्यामुळे प्रस्तुत लेखात संस्थेच्या वाटचालीचे फक्त धावते वर्णन केले आहे.

## परिषदेची वाटचाल

१९१३ ते १९३५ अशी जवळजवळ २३ वर्षे परि-

षदेचे सर्व कार्य मुंबई येथून चालत असे ते मुख्यत: कै. रा. ब. दा. ग. पाध्ये यांच्या नेतृत्वाखाली. या काळात साहित्य संमेलने १३ भरली. त्यांतली ७ बृहन्महाराष्ट्रात भरली. विविध-ज्ञान विस्ताराला जोडून परिषदेचे मुखपत्र, 'साहित्य-पत्रिका' निघू लागले. १९१७ साली इंदूरच्या संमेलनप्रसंगी सवाई तुकोजीराव होळकर महाराजांकडून संस्थेच्या स्थैर्यासाठी दहा हजार रुपयांची देणगी लाभली. ती लाभल्यामुळे ट्रस्ट निर्माण होऊन पुढे संस्था रजिस्टर केली गेली– अशी काही महत्त्वाची कामे झाली. पण सभासदसंख्येत वाढ झाली नाही, कार्याचा विस्तार पुण्या-मुंबईपलीकडे फारसा गेला नाही, परिषदेची कचेरी म्हणजे प्राय: पाध्ये आणि मोरमकर यांची घरे आणि त्यांच्या मदतीला सर भालचंद्र, रावसाहेब मोरमकर, न. र. फाटक अशी काही मोजकी मंडळी. कै. पोतदार यांनी आपल्या इतिहासात या काळातील वाटचाल मंदगतीने चालू होती, असा जो एकूण निष्कर्ष काढला तो बहुतांशी बरोबर आहे. संशोधन, प्रकाशन, कचेरीव्यवस्था, उत्पन्नवाढ, नव्या कार्यकर्त्यांची जोडणी या व अशा अनेक बाबतीत कै. पाध्ये यांचे नेतृत्व कमी पडले असे इतिहास सांगतो. तथापि किशोरपणी आणि यौवनदशेत त्यांनी आपल्या कर्तृत्वाने संस्थेचा प्रतिपाळ केला आणि पुढे १९३५ साली कण्वाच्या अंत:करणाने पुण्यास तिची पाठवणी केली, हे कार्य मोठेच म्हटले पाहिजे.

संस्थेच्या जीवनात खऱ्या अर्थाने यौवनावस्था येते ती वयापेक्षा क्रियाशीलतेमुळे. यादृष्टीने कै. पाध्ये यांच्यानंतर कै. ना. गो. चापेकर यांच्या नेतृत्वाखाली पुण्याला कार्यकर्त्यांचा जो नवा संच उत्साहाने कामाला लागला, त्या काळाला परिषदेची यौवनावस्था म्हणणे शोभून दिसेल. हा काळ आहे साधारणपणे १९२८ ते १९३७ या दशकाचा, म्हणजे कै. चापेकर यांच्या नेतृत्वाचा. साहित्य संमेलने व परिषद यांच्या परस्पर संबंधाबाबत या काळात वादाचा बराच गदारोळ उठला होता. मुंबई विरुद्ध पुणे असेही थोडे स्वरूप या वादाला आले होते, पण खरा वाद होता तो मुंबईचे परिषदेचे कार्यालय प्राय: एकतंत्री व निष्क्रीय बनल्यामुळे तिथून ते हलवून पुण्याला आणावे आणि चापेकरांसारख्या निवृत्त, विद्वान, सौजन्यशील न्यायमूर्तींच्या नेतृत्वाखाली ते गतिशील करावे, हा होता. अखेर घटना-नियमांचा पुष्कळ काथ्याकूट होऊन १९३१ च्या हैद्राबाद संमेलनप्रसंगीच्या वार्षिक साधारण सभेने कार्यालय पुण्याला नेण्यास संमती दिली. प्रत्यक्षात ही गोष्ट पुढे दोन वर्षांनी घडली.

कै. नानासाहेब चापेकर यांच्या नेतृत्वकाळात त्यांनी दे. द. वाडेकर, कृ. पां. कुलकर्णी, द. वा. पोतदार, रा. दा. देसाई, ग. गं. जांभेकर, चिं. ग. कर्वे, शं. दा. पेंडसे, धनंजयराव गाडगीळ, भा. कृ. उजगरे, के. नारायण काळे, माधव जूलियन असे भिन्नभिन्न प्रवृत्तीचे, पण तळमळीचे नवे कार्यकर्ते परिषदेच्या लगामी लावले आणि या सर्वांनी एक नवीन उत्साहाचे वातावरण निर्माण करून परिषदेला मोठी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. दे. द. वाडेकर, कृ. पां. कुलकर्णी आणि चिं. ग. कर्वे या तिघांची चिटणीशी विशेष उल्लेखनीय झाली. साहित्यप्रसार, संशोधन आणि समीक्षा यांना वाहिलेली 'म. सा. पत्रिका' स्वतंत्रपणे त्रैमासिक स्वरूपात नियमित प्रसिद्ध होऊ लागली. औंधाचे रसिक दानशूर राजे भवानराव पंतप्रतिनिधी यांचेकडून कार्यालयासाठी ९९९ वर्षांच्या कराराने (भाडे वर्षास रु. १५) जागा मिळविली व तिच्यावर प्रथम छोटी इमारत उभारली. व्याकरण, शुद्धलेखन, परिभाषा इत्यादी विषयांबाबत भरपूर चर्चासभा भरवून काहीएक विधायक कार्य साधले गेले. साहित्य संमेलने तर दरवर्षी भरविली गेली आणि कोल्हापूर वगळता ती सर्वदूर बृहन्महाराष्ट्रात भरली. सभासदसंख्येत लक्षणीय भर पडली. कचेरी सुव्यवस्थित थाटली गेली आणि आर्थिक व्यवहार चोखपणे पार पडू लागले. मुंबई मुक्कामी मरगळीस आलेल्या परिषदेला मुळामुठेचे पाणी एकंदरीने चांगले मानवू लागले. त्यामुळे तिच्या भावी विस्ताराला साहजिकच चारी दिशा मोकळया झाल्या.

इथून पुढल्या स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतच्या दशकात परिषदेची सर्वांगाने आगेदौड झाली, ती मुख्यत: न. चिं. केळकर, वा. म. जोशी, काकासाहेब लिमये, ख्रिस्तवासी रावसाहेब र. लु. जोशी, वि. द. घाटे, रा. श्री. जोग, के. नारायण काळे, कोशकार कर्वे-दाते इत्यादींच्या कर्तृत्वामुळे. र. लु. जोशी यांच्या चिटणीशी कारकीर्दीत सभासदसंख्या दुप्पट म्हणजे ९०० वर गेली, यावरून त्यांच्या संघटनकौशल्याची कल्पना येऊ शकते र. लु. आणि विठ्ठलराव घाटे यांच्या प्रयत्नांमुळे परिषदेचे 'माधवराव पटवर्धन सभागृह' उभारले गेले (उद्घाटन– दि. ३०-११-१९४२) आणि त्यामुळे सभा, व्याख्याने, चर्चा, परिसंवाद इत्यादी कार्यक्रमास मुक्तांगण लाभले.







## स्वातंत्र्योत्तर काळात

स्वातंत्र्यप्राप्तीपासून ते संयुक्त महाराष्ट्र स्थापनेपर्यंतच्या तेरा वर्षांच्या काळात परिषदेच्या कार्याचा आणखी विस्तार झाला. कै. श्री. म. तथा बापूसाहेब माटे यांनी आपल्या कार्याध्यक्षपदाच्या तीन-चार वर्षांच्या काळात मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची योजना हाती घेऊन वाटचालीस लावली, निबंधमालाकार चिपळूणकर यांच्या स्मरणार्थ 'चिपळूणकर सभागृह' उभारले (१९ मे १९५१) आणि परिषदेचे पहिले ज्येष्ठ संस्थापक चिटणीस कै. वा. गो. आपटे यांच्या ट्रस्टमधून दहा हजार रुपयांची देणगी मिळवून 'आपटे संदर्भग्रंथालय' साकार केले. (१९४९) आज या ग्रंथालयात सुमारे २३,००० ग्रंथ आहेत. त्याचा लाभ घेणारे ५०० सभासद असून त्यात महाविद्यालयीन विद्यार्थीवर्ग व इतर अभ्यासक यांचा समावेश आहे. १९३८ पासून सुरू झालेल्या मराठीच्या प्राज्ञ, विशारद (नंतर प्रथमा, प्रवेश) आणि आचार्य या परीक्षा महाराष्ट्रात नि महाराष्ट्राबाहेर लोकप्रिय होऊन सुमारे ४० हजार विद्यार्थी उत्तीर्ण झाले, ते याच काळात. पुढे संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनंतर माध्यमिक व उच्च स्तरांवर सर्वत्र शिक्षणसंस्था मोठ्या प्रमाणात निर्माण होऊ लागल्या व मराठीच्या अभ्यासाला अधिकाधिक संधी मिळू लागली. त्यामुळे परिषदेच्या परीक्षांना बसणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या यानंतरच्या काळात साहजिकच रोडावू लागली आणि १९७४-७५ नंतर परीक्षा जवळजवळ बंद झाल्या. तथापि गेल्या तीन-चार वर्षांपासून त्या पुन्हा सुरू करण्यात आल्या आहेत.

परीक्षांचा प्रसार करण्यात सर्वाधिक वाटा चिटणीस कै. वा. दा. गोखले यांचा होता. कै. गोखले जवळजवळ १०-१२ वर्षे चिटणीस होते. भाषा, व्याकरण, शुद्धलेखन, अध्यापन, व्यवस्थापन अशा अनेक गोष्टींत त्यांना विलक्षण रस होता. त्यांची निःस्वार्थ चिटणिशी कारकीर्द अनेक दृष्टीने विधायक ठरली. कै. गं. भा. निरंतर, कै. प्रा. अरविंद मंगरुळकर, कै. श्री. शं. नवरे अशा काही मोजक्या चिटणीसांची अनेकविध कामगिरी संस्थेला अशीच उपकारक ठरली. संपादक वा. रा. ढवळे यांचे प्रदीर्घ साहचर्य म्हणजे मुंबई-पुण्याचा एक दुवा ठरला. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर एक वर्षाने— मराठी साहित्य महामंडळ— या नव्या मध्यवर्ती साहित्यसंस्थेची स्थापना झाली. काळाचा तो एक अपरिहार्य परिणाम होता. पण या घटनेमुळे परिषदेचे प्रातिनिधिकत्व लोपले व महामंडळाची एक घटकसंस्था या नात्याने तिचे कार्यक्षेत्र पश्चिम महाराष्ट्रापुरते सीमित झाले. इथे अभिमानपूर्वक एक गोष्ट सांगितली पाहिजे की, हे सर्व स्थित्यंतर घडवून आणण्यात १९५७ च्या संमेलनापासून परिषदेनेच प्रथम मोठ्या मनाने पुढाकार घेतला होता. इतकेच नव्हे तर महामंडळ आपल्या पायावर नीट उभे राहीपर्यंत पुढली तीन मराठी साहित्य संमेलने परिषदेने भरविली. १९६४ मधील मडगाव येथील कुसुमाग्रजांचे अध्यक्षतेखाली भरलेले ४५ वे भव्य संमेलन हे परिषदेने भरविलेले शेवटचे संमेलन.

१९६१ ते १९८६ हा प्रस्तुत वाटचालीतील अखेरचा कालखंड म्हणता येईल. कार्याच्या दृष्टीने या व आधीच्या थोड्या काळात ज्या अनेक कार्यकर्त्यांनी सेवा बजावली त्यात कै. रा. श्री. जोग, कै. के. नारायण काळे, कै. श्री. के. क्षीरसागर, महाराष्ट्रकवी यशवंत, गं. बा. सरदार, न. का. घारपुरे, श्री. वि. त्र्यं. शेटे, मो. रा. वाळंबे, रा. शं. वाळिंबे, स. कृ. पाध्ये, ग. ल. ठोकळ, भीमराव कुलकर्णी, अनंतराव कुलकर्णी, रा. ज. देशमुख, दा. दि. कुलकर्णी, स. गं. मालशे, भालचंद्र फडके, श्री. ज. जोशी, वि. रा. करंदीकर, म. श्री. दीक्षित, वि. ग. कानिटकर, हेमंत इनामदार, ग. वा. बेहेरे, राजेंद्र बनहट्टी, राजा फडणीस इत्यादी पदाधिकाऱ्यांची कामगिरी विशेष उपयुक्त ठरली. प्रस्तुतचा एकूण काळ सर्वांगाने भरभराटीचा गेला यात शंका नाही.

१९७० च्या जानेवारीत परिषदेचा हीरक-महोत्सव थाटात साजरा झाला. कै. रा. श्री. जोग यांच्या कुशल संपादकत्वाने वाङ्मयेतिहास योजनेतील ३ ते ५ असे तीन खंड प्रकाशित झाले. साहित्य संमेलनाची अध्यक्षीय भाषणे व इतर ग्रंथ प्रकाशित झाले. साहित्य पत्रिकेचे स्वरूप अंतर्बाह्य बदलून सर्वसामान्य वाचकांच्या दृष्टीने ती वाचनीय ठरली. कै. काकासाहेब गाडगीळ यांच्या प्रयत्नांमुळे १९६४ साली परगावच्या अभ्यासक-सभासदांसाठी चार खोल्यांचे एक अतिथी-भवन उभारले गेले. (१५ ऑगस्ट १९६४) महाराष्ट्राच्या सर्व भागांत आजीव आणि वार्षिक सभासदसंख्या झपाट्याने वाढली, वाढत आहे. कै. रा. श्री. जोग, कै. के. नारायण काळे आणि प्रा. गं. बा. सरदार यांचा परिषदेशी जो अनेक नात्याने प्रदीर्घ संबंध आला,

त्यामुळे परिषदेच्या प्रतिष्ठेत भर पडली. गेल्या तीन-चार वर्षांत वाङ्मयेतिहास योजनेतील खंड १ व २ प्रकाशित झाले. "भाषा व साहित्य : संशोधन" (दोन खंडात) हा प्रकल्पही जवळजवळ पूर्ण झाला. आणखी काही संशोधनपर ग्रंथ प्रकाशित होण्याच्या मार्गावर आहेत. परिषदेच्या या एकूण कार्यात पुण्यातील कार्यकर्त्यांवर साहजिकच अधिक भर पडत असतो. तथापि कार्यकारी मंडळावरील परस्थ सभासद आणि ठिकठिकाणच्या शाखासभांचे पदाधिकारी यांचे सहकार्यमुद्धा विसरता येत नाही. कै. अ. ना. भालेराव, बापूराव नाईक, ना. ग. जोशी, म. ना. अदवंत, म. वि. फाटक, ह. श्री. शेणोलीकर, द. वा. डावरे, शं. गो. पटवर्धन, कृ. व. निकुंब, वा. रं. सुंठणकर वि. भि. कोलते, भ. श्री. पंडित, राम शेवाळकर, गो. म. कुलकर्णी, व. दि. कुलकर्णी, वसंत स. जोशी इत्यादी परस्थ कार्यकर्त्यांचा संस्थेशी प्रदीर्घ काळ जो अनेक वर्षे निकट संबंध येत गेला तोही फार लाभदायक ठरला.

## वाढती सदस्यसंख्या

ऐंशी वर्षांच्या या वाटचालीकडे थोडे अलिप्तपणे पाहिले की, अभिमान आणि समाधान वाटावे असे बरेच काही आढळून येते.

परिषदेचा कारभार कालानुरूप बदलत गेलेल्या घटनानियमांनुसार लोकशाहीपद्धतीने चालत आला. कार्यकारी मंडळाच्या व वार्षिक सभांच्या बैठकी वेळच्या वेळी झाल्या आणि सभासदांपुढे दरवर्षी कार्यवृत्तांत, जमाखर्चपत्रके, अर्थसंकल्प इत्यादी आवश्यक गोष्टी 'पत्रिके'द्वारे सादर केल्या गेल्या.

कार्यकर्त्यांमध्ये क्वचित कोठे मतभेद झाले किंवा वाद विकोपाला गेले तरी संस्थेच्या नैमित्तिक कारभाराचा गाडा कार्यालय कार्यक्षम ठेवले गेल्यामुळे सतत चालू राहिला.

थोडे बारकाईने पाहिले तर सत्तरीनंतर अलीकडच्या पाच-सात वर्षांत परिषदेच्या सभासदसंख्येत, विशेषतः आजीव सभासद संख्येत, तसेच शाखांच्या संख्येत लक्षणीय भर पडली व त्यामुळे संस्थेचा स्थिरनिधी दीड-दोन लाख रुपयांनी तरी वाढला. याशिवाय अलीकडे काही साहित्यप्रेमी उदार व्यक्तींनी ग्रंथ पारितोषिकांसाठी व व्याख्यानादी कार्यक्रमांसाठी भरघोस देणग्या देऊन परिषदेच्या कार्याला बाळसे आणले ते वेगळेच. पुण्यातील व पुण्याबाहेरील साहित्यप्रेमी व्यक्तींना परिषद आकर्षू शकते, याचा एकापरी हा पुरावाच.

आज परिषद महामंडळाची घटकसंस्था म्हणून नांदत आहे. तथापि तिचे सभासद होण्यास सर्वांना मोकळीक ठेवली आहे. मुंबई, विदर्भ, मराठवाडा, बृहन्महाराष्ट्र, गोवा इत्यादी भागांत मिळून आजही परिषदेचे सुमारे पाचसहाशे सभासद आहेत आणि ते सर्व सामाजिक स्तरांतील साहित्यभक्त आहेत. आजमितीस आजीव १८०० आणि वार्षिक २००० मिळून परिषदेची सभासदसंख्या ३८०० आहे.

परिषद ज्या काळात व ज्या उद्दिष्टाने स्थापन झाली तो काळ आता मागे पडला आहे व विकेंद्रीकरणाची प्रक्रिया इतर क्षेत्राप्रमाणे याही क्षेत्रात झपाट्याने चालू झाली आहे.

परिषदेच्या धर्तीवर महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर अनेक लहानमोठ्या साहित्यसंस्था स्थापन झाल्या. अगदी जिल्हा–तालुका पातळीपर्यंत या संस्थांचे जाळे पसरत आहे.

साहित्यविषयक चळवळीचा हा चारी दिशांना पसरू पाहणारा प्रवाह कोणी रोखू म्हटले किंवा एकत्र बांधून पुण्यासारख्या एकाच ठिकाणाहून तो नियंत्रित करू म्हटले तरी ते जमणारे नाही.

विकासासाठी, सोयीसाठी ज्या वेगवेगळ्या चुली मांडल्या जात आहेत, त्यांचे परस्परसंबंध गुण्यागोविंदाचे कसे राहतील व आपले कार्यक्षेत्र अधिक कार्यक्षम कसे करता येईल एवढेच आता परिषदेला करता येण्यासारखे आहे व ते कार्य परिषद करीत आहे. त्यातून गेल्या पंचवीस-तीस वर्षात शासकीय आणि विद्यापीठीय स्तरावर साहित्य नि सांस्कृतिक कामे मोठ्या प्रमाणावर चालू झाल्यामुळे प्रस्थापित साहित्यसंस्थांच्या कार्याचा आपोआप संकोच होत चालला आहे.

ही सर्व कारणे विचारात घेतली म्हणजे परिषदेने आजवर केलेले कार्य अभिमानास्पद आहे असे म्हटले तर ते उचित होईल.

शं. ना. अंधृटकर

# मुंबई मराठी साहित्य संघ

मराठी भाषेच्या सर्वांगीण उन्नतीसाठी प्रयत्न करण्याकरिता स्थापन झालेल्या 'महाराष्ट्र साहित्य परिषद' या त्या कालखंडातील मध्यवर्ती संघटनेचे कार्यालय १९१२ ते १९३२ या कालात मुंबईत होते. १९३३ साली हे कार्यालय मुंबईतून पुणे येथे हलविण्यात आल्यानंतर मुंबईत या प्रकारचे कार्य करणारी संस्था उरली नव्हती. मुंबईतील महाराष्ट्रीय समाजाला एकत्र आणणारी कोणती गोष्ट असेल तर मराठी भाषेवरील त्यांचे प्रेम हीच होय. त्या भाषाप्रेमाने एकत्र येऊन काही काळ सामाजिक, राजकीय अगर इतर मतभेद विसरण्याचा मार्ग योग्य संस्थेच्या अभावी बंद पडल्यासारखा झाला होता. मुंबईकर मराठी सुसंस्कृत माणसाला हे परिषदेचे स्थलांतराचे शल्य स्वस्थ बसू देत नव्हते. योग्य संस्थेचा अभाव तीव्रतेने जाणवत असतानाच मुंबईचे रहिवासी झालेले कै. रावसाहेब र. लु. जोशी (भगूरकर) व श्री. गो. गो. अधिकारी यांनी पुढाकार घेऊन भरविलेल्या सभेतील विचारविनिमयानंतर मुंबई मराठी साहित्य संमेलन या नावाने एक संमेलन भरविण्याचा निर्णय घेण्यात आला. या सभेनंतर दि. ३ जून १९३४ रोजी कै. श्री. पु. रा. लेले यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सभेत 'मुंबई मराठी साहित्य संमेलन १९३४' या नावाने साहित्यप्रेमी लोकांचे एक संमेलन भरविण्याचा निर्णय कायम करण्यात आला; व पंधरा लोकांचे एक कार्यकारी मंडळ निवडण्यात आले. अध्यक्ष म्हणून प्राचार्य ले. क. अ. वा. गजेंद्रगडकर यांची निवड करून कार्यास प्रारंभ झाला. अनेक समित्या व पोटसमित्यांवर सहकार्यास उत्सुक असलेल्या व्यक्तींची निवड करून सर्वसमावेशक स्वरूप निर्माण करण्यात आले. या सर्वांनी संमेलनाची प्राथमिक तयारी पूर्णत्वास नेऊन दि. ६ व ७ ऑक्टोबर १९३४ रोजी हे संमेलन भरविले. या संमेलनाच्या अध्यक्षपदी गुरुवर्य कृ. अ. केळुस्कर यांची निवड करण्यात आली. संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते प्रा. ले. क. अ. वा. गजेंद्रगडकर. संमेलनाचे स्थळ होते मुंबईतील मुझफराबाद हॉल.

संमेलनातील स्वागताध्यक्षीय भाषणात हे संमेलन भरविण्यामागील हेतू विशद करताना त्यांनी पुढीलप्रमाणे सांगितले. "या संमेलनाचा दुसरा हेतू असा आहे की, मुंबई व उपनगरे यांकरिता एका मध्यवर्ती साहित्यविषयक संस्थेची स्थापना करावी. कार्यकारी मंडळाने या विषयी एक योजना तयार केली असून ती योग्य वेळी आपल्या पसंतीकरिता आपणापुढे मांडली जाईल. जर या साहित्य संमेलनाने अशा प्रकारच्या मध्यवर्ती साहित्य संस्थेची स्थापना केली तर एक मोठे कामच केल्यासारखे होईल यात शंका नाही." संमेलनाने पहिला ठराव पुढीलप्रमाणे केला.

"या संमेलनाचे ठराव अमलात आणण्याच्या योग्य उपायांची योजना करण्यासाठी व १९३५ सालापासून होता होईल तो दरसाल मुंबई (शहर व उपनगरे) येथे साहित्य संमेलन भरविण्यासाठी हे संमेलन पुढील कमिटी नेमीत आहे. या कमिटीने मुंबई शहर व उपनगर यांतील वाङ्मय संस्थांशी विचारविनिमय करून त्यांच्या प्रतिनिधींच्या सहकार्याने मध्यवर्ती संस्थेची घटना होता होईल तो या सालच्या डिसेंबर अखेरीपर्यंत तयार करावी व १९३५ सालच्या जानेवारी महिन्यात या संमेलनाच्या वाङ्मय संस्थांच्या प्रतिनिधींची सभा बोलावून या सभेत पास होईल अशा घटनेनुसार मुंबई (शहर व उपनगर) येथील साहित्य संस्था व साहित्यिक यांची एक मध्यवर्ती संस्था स्थापन करावी." या ठरावाशिवाय अनेक महत्त्वाचे ठराव या संमेलनात संमत करण्यात आले.

या संमेलनाच्या कार्यकर्त्यांच्यापैकी काही जणांच्या नुसत्या नामनिशीची नोंद घ्यावी घेतली तरी त्या वेळच्या मुंबापुरीतील मराठी समाजातील बहुतेक प्रमुख व्यक्ती या कामात अहमहमिकेने भाग घेत होत्या असे प्रत्ययास येईल.

नामदार बॅ. मु. रा. जयकर, नामदार श्री. भास्करराव जाधव, प्राचार्य ले. क. अ. वा. गजेंद्रगडकर, श्री. दत्तो आप्पाजी तुळजापूरकर, प्रा. मा. दा. आळतेकर, प्रा. कृ. पां. कुलकर्णी, प्रा. द. के. केळकर, सॉ. सुकथनकर, प्रा. वि. ह. कुलकर्णी, श्री. श्री. म. वर्दे, श्री अनंत हरी गद्रे, श्री. ना. के. भागवत, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. अनंत काणेकर, श्री. र. धों. कर्वे, श्री. य. कृ. खाडिलकर, श्री. गो. वा. महाशब्दे, श्री. के. रा. पुरोहित, श्री. लालजी पेंडसे, श्री. अप्पा पेंडसे, श्री. का. म. ताम्हनकर, प्रा. वा. दा. गोखले, श्री. भा. रा. धुरंधर, श्री. खंडेराव सुळे, श्री. रामराव विजयकर, श्री. स. वि. राव, श्री. प्रभाकर पाध्ये, श्री. चं. वि. बावडेकर, श्री. न. रा. पारसनीस, श्री. वसंतराव मराठे, श्री. रमेश नाडकर्णी, श्री. श्री. रा. टिकेकर, श्री. वा. वि. भट, श्री. प्रभाकर गुप्ते, श्रीमती शांताबाई कशाळकर, श्रीमती शांताबाई दांडकर, श्रीमती पिरोजबाई आनंदकर, श्रीमती सीताबाई अण्णेगिरी, श्री. दा. सा. यंदे, श्री. र. लु. जोशी, श्री. गो. गो. अधिकारी, श्री. त्र्यं. शं. शेजवलकर, श्री. वामनराव ढवळे, श्री. खं. सा. दांडकर, श्री. दि. वि. आमोणकर आणि डॉ. अ. ना. भालेराव. जीवनाच्या विविध क्षेत्रात आपल्या कर्तृत्वाने तपळणाऱ्या कार्यकर्त्यांच्या ठायी एक तीव्र भावना होती ती म्हणजे या महानगरीत मराठी साहित्य आणि संस्कृतीचा उदोउदो व्हावा हीच. यामुळेच हे मुंबई मराठी साहित्य संमेलन (१९३४) ही एक अपूर्व घटना होती. आणि या घटनेतूनच एका संस्थेच्या जन्माची पूर्व तयारी यशस्वीपणे झाली हे निःसंशय सिद्ध होते.

संमेलनातील उपरिनिर्दिष्ट ठरावानुसार सर्व कार्यवाही करण्यासाठी कमिटीने पूर्ण विचारांती दि. २१ जुलै १९३५ रोजी 'मुंबई मराठी साहित्य संघ' या नावाची संस्था रीतसर स्थापन केली. दहा वाङ्मयीन संस्था व साठ व्यक्ती सभासदांच्या नोंदणीनंतर दि. १९–१–१९३६ रोजी साहित्य संघाची पहिली साधारण सभा झाली. या संस्थेचे कार्यालय संस्थेचे संस्थापक एक चिटणीस डॉ. भालेराव यांच्या विठ्ठलभाई पटेल रोडवरील 'नारायण मॅन्शन' या निवासस्थानी होते.

या संस्थेच्या घटनेत पुढील उद्देशाची नोंद आहे :

"मराठी भाषा व साहित्य यांच्या सर्वांगीण अभिवृद्धीसाठी प्रयत्न करणे, उपाय योजणे, त्यासाठी झटणे आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणे."

हे उद्देश साध्य करण्यासाठी ज्या साधनांचा उपयोग करावा त्याची घटनेत नोंद पुढीलप्रमाणे आहे.

(अ) मराठी भाषा, साहित्य व नाटच यांचे शास्त्रीय व कलात्मक शिक्षण देण्याकरिता वर्ग, शाळा व महाविद्यालय चालविणे, नाटचविषयक व साहित्यविषयक प्रचार करणे, चढाओढी लावणे, प्रदर्शने भरविणे, चर्चा व वादविवाद-मंडळे चालविणे, वक्तृत्वकलेच्या अभ्यासाची सोय करणे, साहित्यविषयक पुस्तकांचा संग्रह करणे, साहित्य भक्तांची सालोसाल शक्यतो संमेलने भरविणे, नियतकालिके व प्रकाशने प्रसिद्ध करणे व संघ कार्याची वेळोवेळी प्रसिद्धी करणे.

(आ) नाटक, चित्रपट, गायन, नृत्य आदी कलांचे कार्यक्रम करून संघाचे आर्थिक बल वाढविणे, निधी जमविणे, देणग्या, वर्गण्या, पारितोषिके आदींचा संघाच्या उद्देशाला व हितसंबंधाला अबाधित अटींवर स्वीकार करणे.

(इ) संघास स्थैर्य व कायम स्वरूप प्राप्त होण्यासाठी सभागृह, नाटचगृह, तसेच अन्य इमारती बांधणे, विकत घेणे व विकणे, भाड्याने देणे व घेणे.

(ई) निकडीची गरज भासल्यास ठेवींच्या रूपाने पैसे घेणे, कर्ज रोख्यांच्या रूपाने किंवा अन्य रीतीने कर्ज काढणे व त्यासाठी संघाची स्थावर जंगम मालमत्ता तारण म्हणून किंवा अन्य तऱ्हेने गहाण ठेवणे.

(उ) जरूर असेल अशा ठिकाणी संघाच्या कार्यक्षेत्रात संघाच्या शाखा स्थापणे किंवा समान उद्देश असलेल्या अन्य संस्था संघात सामील अथवा संघाशी संलग्न करून घेणे, त्यांचे सहकार्य घेणे, त्यांच्याशी सहकार्य करणे, किंवा अशा स्वरूपाच्या अन्य संस्थांशी संलग्न होणे.

(ऊ) आणि संघाचे उद्देश साधण्यासाठी इतर योग्य असे उपाय योजणे.

टीप १ : प्रचलित राजकारणाच्या प्रत्यक्ष चळवळीपासून संघ अलिप्त राहील.

टीप २ : मुंबई मराठी साहित्य संघ ही मराठी साहित्य महामंडळाची घटक संस्था असल्यामुळे व महामंडळाच्या घटनेप्रमाणे संघाला इतर घटक संस्थांच्या बरोबरीने प्रतिनिधित्व मिळालेले असल्यामुळे, महामंडळाचे ठराव व भाषाविषयक एकंदर धोरण आणि महामंडळाचे आदेश संघाला बंधनकारक राहतील.

...३

१९३५ सालात संघाची स्थापना झाली. मात्र साहित्य संघाने महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याशी सवतासुभा न करता परिषदेचे महाराष्ट्रातील मध्यवर्ती स्थान मान्य करून परिषदेच्या कार्यात सदैव सहभाग दिला. इतकेच नव्हे, तर साहित्य संघाचे सुरुवातीचे सक्रीय कार्यकर्ते प्रा. वा. दा. गोखले हे पुण्यास स्थायिक झाल्यावर त्यांनी म. सा. परिषदेचे चिटणीस म्हणून अनेक वर्षे काम केले. साहित्य संघाचे संस्थापक चिटणीस डॉ. अ. ना. भालेराव हेही काही काळ परिषदेचे एक चिटणीस म्हणून कार्यरत होते. रा. सा. र. लु. जोशी हे परिषदेचे चिटणीस व काही काळ कार्याध्यक्ष म्हणूनही कार्यरत होते. संघाचे एक ज्येष्ठ कार्यकर्ते श्री. वामनराव ढवळे हे परिषदेच्या कार्यकारीणीवर अनेक वर्षे सदस्य म्हणून व पत्रिकेचे संपादक म्हणून कार्य करीत होते. याशिवाय कै. बापूराव नाईकांसारखे संघाचे कार्यकर्ते परिषदेच्या कार्यात रस घेत होते, तर परिषदेच्या अनेक नामवंत सदस्यांनी संघाच्या कार्यात सहभागी होऊन मराठी भाषा व साहित्य यांची भरघोस सेवा केली आहे. यावरून संघाच्या स्थापनेमुळे मुंबईत परिषदेचे कार्य सातत्याने सुरू राहण्यात हातभारच लागला असे म्हटले असता वावगे होणार नाही.

मराठी साहित्य महामंडळाच्या निर्मितीत संघाने सक्रीय पुढाकार घेतला व महामंडळाची एक घटक संस्था म्हणून आपल्या जबाबदारीचा वाटा पूर्णपणे उचलला.

ज्या उद्देशासाठी संघ स्थापन झाला त्यानुसार मुंबई व उपनगर मराठी साहित्य संमेलनाची आजवर २५ अधिवेशने मुंबई व उपनगरात भरविली आहेत. अनेक साहित्यसेवकांना प्रथमतः या संमेलनाचे अध्यक्षपद मिळे व नंतर परिषदेच्या वतीने भरणाऱ्या व नंतर महामंडळाच्या वतीने भरलेल्या संमेलनाचे अध्यक्षपद मिळत असे.

१९३८ साली संघाने मराठी साहित्य संमेलनाचे अधिवेशन भरविले. या संमेलनाचे अध्यक्ष होते स्वातंत्र्यवीर सावरकर. या संमेलनात प्रथमतः प्रतिनिधींच्या साठी करमणुकीचा कार्यक्रम संघाने श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या अप्रयोगित व अप्रकाशित 'मायाविवाह' या नाटकाचा प्रयोग सादर केला. या प्रथेचा पुढील कालातील संमेलनांनी अवलंब केल्याचे आढळून येईल. साहित्याच्या अभिवृद्धीबरोबरच नाट्य, संगीत, चित्र, नृत्य या कलांचा परामर्षही साहित्य संमेलनाने घेतला पाहिजे व समाजाच्या सांस्कृतिक जीवनाची पातळी उंचावण्यास साहाय्यभूत झाले पाहिजे हा उद्देश या उपक्रमामागे होता.

१९५० साली संघाने पुन्हा साहित्य संमेलनाचे अधिवेशन मुंबईस राजकवी य. दि. पेंढरकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविले. या संमेलनात भाषा व व्याकरण, काव्य, कथा वाङ्मय, वृत्तपत्र वाङ्मय, टीका वाङ्मय ही शाखा संमेलने अनुक्रमे प्रा. कृ. पां. कुलकर्णी, श्री. बा. सी. मर्ढेकर, श्री दिवाकर कृष्ण, श्री बाबूराव पराडकर व प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली भरविली होती. यात अनेक मान्यवरांनी विषयानुरूप निबंध वाचून त्यावर चर्चा करण्यात आली. असा उपक्रम प्रथम होत होता. त्यामुळे या संमेलनाचे ते वैशिष्ट्य ठरले. संमेलन प्रसंगी 'महाराष्ट्राची रूपसंपदा' नावाने प्रदर्शन भरविण्यात आले होते. या प्रदर्शनाचे मुख्य अंग मुंबईचा विकास हे होते. यामुळेच मुंबई महाराष्ट्राचीच का हे सुलभतेने नजरेत भरत होते. याच निमित्ताने १९२० ते १९५० या कालखंडातील मराठी कवितेचा प्रातिनिधिक असा काव्यसंग्रह 'मराठी कविता' या नावाने प्रकाशित झाला. याही संमेलनाचे वेळी काव्यगायन, पोवाडे, नृत्य इ. कार्यक्रम होतेच, शिवाय श्री वि. वा. शिरवाडकर यांच्या 'वैजयंती' नाटकाचा प्रयोग मुद्दाम करण्यात आला होता.

संमेलनाच्या उपक्रमाशिवाय १९३७ पासून संघाने आपला स्थापना दिवस संघ– दिन म्हणून साजरा करण्याची प्रथा सुरू केली. या निमित्त महनीय प्रवक्त्याचे भाषण, काव्यगायन, नाट्य प्रवेश, एकांकिका, चर्चा परिसंवाद इत्यादी कार्यक्रमाची जोड दिलेली असे. काही वेळा तर या कार्यक्रमाची व्याप्ती सप्ताहभर असे.

याशिवाय पुढील व्याख्यानमालाही संघाच्या विद्यमाने होत असतात. कै. वामन मल्हार जोशी स्मारक व्याख्यान माला, डॉ. अ. ना. भालेराव स्मा. व्या., कै. ह. ना. आपटे स्मा. व्या., कै. अण्णा मार्तंड जोशी स्मा. व्या, कै. नाथमाधव स्मा. व्या. माला, कै. लालजी पेंडसे स्मा. व्याख्यानमाला, कै. वि. स. खांडेकर स्मा. व्या. माला, कै. ल. ग. जोग स्मा. व्या. माला. या व्यतिरिक्त हेमंत व्याख्यानमाला, शारदोत्सव व्याख्यानमाला, मासिक व्याख्यानमाला, इ. व्याख्यानमालातून नामवंत

अभ्यासकांची व्याख्याने होत असतात. दिवंगत साहित्यिकांच्या जन्मशताब्दीनिमित्त व्याख्याने, परिसंवाद,चर्चा आदी भरघोस कार्यक्रम साजरे करण्यात येतात. संघाध्यक्ष कै. न. र. फाटक यांनी आपल्या कारकीर्दीत सुमारे ८०० व्याख्याने विविध विषयावर दिली. नैमित्यिक व्याख्याने ही सदैव होत असतात. आजतागायत संघाने २१ महत्त्वाच्या पुस्तकांची प्रकाशने केली असून यांतील काहींच्या दोन अगर तीन आवृत्त्याही प्रसिद्ध केल्या आहेत. ही सर्व प्रकाशने मराठी भाषेच्या अभ्यासकांना उपयुक्त ठरली आहेत. संघाने सुरुवातीस 'वीणा' नंतर 'साहित्य' ही द्वैमासिके काही काळ चालविली. शक्य तेव्हा 'साहित्य' वार्षिकही प्रकाशित केले.

वरील उपक्रमांशिवाय प्रथमतः म. सा. परिषदेच्या वाङ्मयीन परीक्षांसाठी वर्ग चालविले व परीक्षा केंद्र म्हणून कार्य केले व नंतर स्वतःच्या वाङ्मयीन परीक्षा सुरू करून त्यासाठी निरनिराळी केंद्रे उघडून वर्ग चालविले व परीक्षा घेतल्या व हे महत्त्वाचे कार्य सातत्याने चालू आहे. मुंबईतील अ-मराठी भाषिकांचे मराठी भाषा शिकविण्याचे वर्ग संघ चालवीत असतो व आजतागायत सुमारे ५०००/ अ-मराठी भाषिकांनी या उपक्रमात सहभागी होऊन मराठी भाषेचा अभ्यास करून परीक्षा दिल्या आहेत. या वर्गाचे संचालक म्हणून प्रथमपासून श्री वामनरावजी ढवळे हे त्यांच्या मृत्यूपर्यंत काम पाहत होते. याशिवाय अनेक प्राध्यापकांनी या वर्गासाठी शिक्षक म्हणून योगदान दिल्यामुळेच हे एक उत्तम काम सातत्याने सुरू आहे. रशियन भाषा वर्ग, बंगाली भाषा वर्ग, जर्मन भाषा वर्ग, उर्दू भाषा वर्ग इत्यादी भाषा भागिनींच्या अभ्यास करण्यासाठी संघाने वेळोवेळी वर्ग चालविले.

संघाचे पहिले अध्यक्ष कै. गजेन्द्रगडकर यांच्या स्मारकार्थ संघाने एक संदर्भ ग्रंथालय चालविले आहे.या ग्रंथालयात संदर्भास उपयुक्त अशी ग्रंथ संख्या पंधरा हजारावर आहे. या संदर्भ ग्रंथालयात महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या मालकीची विशेषतः कलाविषयक इंग्रजी पुस्तकेही आहेत. या संदर्भ ग्रंथालयाचा उपयोग अभ्यासूंना सकाळी १० ते रात्री ८ पर्यंत विनामूल्य घेता येतो. मात्र ग्रंथ ग्रंथालयाचा बाहेर दिले जात नाहीत.

साहित्य संघाचे दीर्घकाल अध्यक्ष असलेले प्रा. न. र. फाटक यांचे कायम स्वरूपी स्मारक करण्याच्या हेतूने प्रा. न. र. फाटक संशोधन केंद्र स्थापन केले असून पहिल्या दहा वर्षासाठी नाटक व रंगभूमीविषयक काही विषयांवर संशोधन करण्याचा संकल्प आहे. हे संशोधन मंडळ स्वतंत्रपणे नोंदविले असून यासाठी स्वतंत्र व स्वायत्त समितीची रचना केलेली आहे.

साहित्यविषयक कार्याबरोबरच संघाने सुरुवातीपासून नाट्यविषयक कार्यही सातत्याने करण्याचे व्रत स्वीकारून यासाठी नाट्यशाखा विभाग चालू केला. स्थापनेपासून जरी विविध प्रसंगानिमित्त नाट्यप्रयोगांची निर्मिती संघ करीत होता तरी १९४३ साली मराठी रंगभूमीची शतसांवत्सरी साजरी झाली. यावेळी त्यात साहित्य संघाने पुढाकार घेतला. यानिमित्त संघाने इतर मुंबईतील संस्थांच्या सहकार्याने शतसांवत्सरिक उत्सवाचे आयोजन केले. यासाठी ५ ते ७ हजार प्रेक्षक सामावतील एवढ्या प्रचंड नाट्यगृहाची उभारणी केली. सतत १५ दिवस यात नाट्यप्रयोग होत होते. मराठी रंगभूमीवरील पहिल्या दर्जाचे ज्येष्ठ नट व नवे तरुण नट यांच्या सहकार्याने जुन्या-नव्या नाटकांची निर्मिती केली. या उत्सवामुळे मराठी रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाचा कालखंड सुरू झाला असे म्हटले तर अतिशयोक्ती निश्चितच होणार नाही. या उत्सवास भरघोस प्रतिसाद मिळाल्यामुळे संघाने दरवर्षी नाट्योत्सव साजरे करण्याचे ठरविले व ते १९६० पर्यंत चालू ठेवले. या उत्सवातून संघाने मराठी रंगभूमीवर पूर्वी गाजलेल्या नाटकांचे पुन्हा प्रयोग तर केलेच, पण अनेक नवीन नाटककारांची नवी नाटके निर्मित करून मराठी रंगभूमीला नवीन वळण देण्याचा प्रयत्न केला. आजतागायत ७८ नाटककारांची शेकडो नवी-जुनी नाटके संघाने प्रयोगित केल्याने मराठी रंगभूमीवर आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटविला.

१९५४ साली दिल्ली तेथे झालेल्या राष्ट्रीय नाट्य महोत्सवात संघाने सादर केलेल्या कै. कृ. प्र. खाडिलकरकृत भाऊबंदकी या नाटकास पारंपरिक विभागात प्रथम क्रमांकाचे पारितोषिक मिळाले. त्यामुळे मराठी रंगभूमीचे श्रेष्ठत्व भारतीयांच्या नजरेत भरले.

१९७४ साली जर्मन डेमोक्रॅटिक रिपब्लिकच्या स्थापनेच्या रौप्य महोत्सव प्रसंगी त्यांनी निरनिराळ्या राष्ट्रांतील व भाषिकांतील नाट्यप्रयोगांचा महोत्सव

साजरा केला होता. यात भारताच्या वतीने भाग घेण्याचा मान संघास मिळाला. त्या नाट्योत्सवात सुप्रसिद्ध जर्मन नाटककार बर्टोल ब्रेख्तच्या 'धी कॉकेशियन चॉक सर्कल'च्या आधारे श्री. चि. त्र्यं. खानोलकरांनी लिहिलेल्या 'अजब न्याय वर्तुळाचा' या नाटकाचा प्रयोग केला व नंतर इतरत्रही प्रयोग केले. यामुळे मराठी नाटक वैश्विक रंगभूमीवर तळपू लागले. या प्रयोगाला अमाप यश प्राप्त झाले. जर्मन प्रेक्षकांनी आपल्या नाटककाराचे हे मराठी रूप अस्सल बरहुकूम असल्याची पावती दिली.

संघाच्या नाट्यशाखेने जसा जुन्या कलाकारांचा, दिग्दर्शकांचा, नाटककारांचा बहुमान केला, त्याच रीतीने नवे नाटककार, दिग्दर्शक, कलाकार यांना घडविण्यासाठी सातत्याने प्रयत्न केल्यामुळेच आजच्या घडीला मराठी रंगभूमीवर गाजणारे नाटककार, दिग्दर्शक आणि कलाकार हे साहित्य संघाच्या रंगभूमीवर वाढले आणि आपापल्या तेजाने तळपू लागले आहेत.

१९५७ साली संघाने आजचे प्रथम श्रेणीचे नाटककार पु. ल. देशपांडे यांचे 'तुझे आहे तुजपाशी' हे नाटक आपल्या हौशी कलावंतांच्या संचात सादर केले आणि त्याचे शेकड्यांनी प्रयोग केले. मराठी बाल रंगभूमीचीही सुरुवात संघाने केली. 'मधुमंजिरी' हे पहिले, बालनाट्य संघाच्या रंगभूमीवर प्रकट झाले. संघाने १९४५ पासूनच नाट्यशिक्षण देण्यासाठी सातत्याने प्रयत्न केले. १९६८ साली संघाने कै. डॉ. भालेरावांच्या स्मारकासाठी 'अमृत नाट्य भारती' या नावाने नाट्यशिक्षणाचा कार्यक्रम सुरू केला. यासाठी दिल्लीच्या राष्ट्रीय नाट्य विद्यालयाचे स्नातक संचालक पदी नेमून शास्त्रशुद्ध नाट्यशिक्षणाची सोय उपलब्ध करून दिली. १९४३ नंतरच्या मराठी रंगभूमीच्या वाटचालीत संघाच्या नाट्य कार्याचा वाटा निश्चितच सिंहाचा आहे. रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाच्या वाटचालीचे नेतृत्व संघाने केले हे या कालखंडातील मराठी रंगभूमीच्या इतिहासात निश्चितच नमूद करावे लागेल.

१९४४ साली मराठी रंगभूमीचा शतसांवत्सरिक उत्सवाच्या वेळीच नाटकासाठी उपयुक्त होईल असे सुसज्ज व अद्यावत नाट्यगृह असलेले रंगमंदिर बांधण्याचा संकल्प संघाने जाहीर केला होता. १९६४ साली हे स्वप्न साकार झाले. संघ मंदिरातील नाट्यगृहास संघाचे संस्थापक कार्यवाह, विश्वस्त आणि संघ कार्यासाठी स्वतःचे तन, मन आणि धन वेचणारे कार्यकर्त्यांचे मेरुमणी डॉ. भालेराव यांचे नाव देऊन कृतज्ञता व्यक्त केली. या वातानुकूलित नाट्यगृहात अगदी खर्चापुरते द्रव्य भाडे म्हणून घेतले जाते.

यापुढील कालखंडात एवढ्या कार्याने भागणार नाही याची कार्यकर्त्यांना जाणीव आहे. आज सांस्कृतिक कार्याचे एकंदर स्वरूपच बदलले आहे. सभांना, व्याख्यानांना हजर राहणे वेळेच्या अभावी श्रोत्यांना शक्य होत नाही. आकाशवाणी, दूरचित्रवाणी यांच्या प्रसारामुळेही उपस्थितीवर फार मोठा परिणाम झाल्या कारणाने कार्यपद्धतीत बदल करणे अपरिहार्य झाले आहे. त्यामुळेच नियमित स्वरूपात प्रकाशने करणे, संशोधनाची जास्तीत जास्त कास धरणे, अभ्यासास उपयुक्त ठरतील अशी साहित्य व नाट्यविषयक नियतकालिके नेटाने चालविणे, भाषाभ्यासाची व नाट्याभ्यासाची उच्च स्तरावर सोय करणे याबाबींचा प्राधान्याने पुढील काळात विचार करून पावले उचलली जावीत अशी कार्यकर्त्यांची मनीषा आहे. नव्या दमाच्या निरलस कार्यकर्त्यांची शक्ती संस्थेमागे उभी करणे हेही अगत्याचे आहे.

---

## साभार स्वीकार

### नाटक—एकांकिका

दरवेशी आणि इतर एकांकिका : जयंत पवार; अभिनव प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. १०



अनुक्रमणिका







**राम शेवाळकर**

# विदर्भ साहित्य संघ, नागपूर

आज शिक्षणाचा प्रसार बऱ्याच मोठ्या प्रमाणात वाढलेला आहे. शाळा, महाविद्यालये व विद्यापीठे यांची संख्याही परिणामी वाढत चालली आहे. शिकलेल्यांच्या वाढत्या संख्येबरोबरच वाचणाऱ्यांचीही संख्या वाढणे स्वाभाविकच आहे. हा नवा वाचकवर्ग पूर्वीपेक्षा अधिक व्यापक व वैशिष्टयपूर्ण आहे. समाजाच्या बऱ्हंश स्तरापर्यंत तो पोहचलेला आहे. या वाढत्या वाचकवर्गाचे अदृश्य प्रभुत्व व अप्रत्यक्ष नियंत्रण साहित्यक्षेत्रावर हळूहळू प्रस्थापित होत असल्याचेही निरीक्षणांती लक्षात येऊ शकेल. वाचनाच्या कक्षा जसजशा अक्षांशश्रेणीने विस्तारत जातील, तसतसे आकलनशक्ती, आवडीनिवडी, सांस्कृतिकस्तर, नव्या जाणिवा व अपेक्षा यांचा परोक्ष परिणाम साहित्याच्या निर्मितीवर, प्रसिद्धी माध्यमांवर व प्रसारावर होत जाणार. साहित्यक्षेत्राला नवनवी परिमाणे व नवनवे संदर्भ लाभत जाणार. या नव्या संदर्भांमध्ये साहित्य संस्थांनाही आपल्या परंपरागत कर्तव्यक्षेत्राची कुंपणे ओलांडून नव्या जबाबदाऱ्यांचे आव्हान स्वीकारणे प्राप्त आहे. त्यामुळे यापुढे एक स्थितीशील सांस्कृतिक मठ सांभाळणे ही अल्पसंतुष्ट भूमिकाही सोडणे भाग आहे. आपल्या विविध वाङ्मयीन व सांस्कृतिक उपक्रमांद्वारे वाचकांच्या या नव्या क्षितिजांना स्पर्श करणे, नवशिक्षित, नवजागृतांच्या वाढत्या आकांक्षांशी संवाद राखणे, वाचनप्रियता, रसिकता व अभिज्ञता यांचे वर्तुळ उत्तरोत्तर अधिकाधिक विकसित करता येण्याच्या दृष्टीने डोळसपणे व जाणीवपूर्वक पावले उचलणे त्यामुळेच आता आवश्यक झाले आहे. विदर्भ साहित्य संघाने ही चाहूल ओळखून त्या दृष्टीने काही संकल्प केले व तीन वर्षांच्या कार्यकाळात ते साकार होत असल्याचे सार्थकतेचे समाधानही मिळविले. त्या सफलतेच्या वाटचालीचा हा संक्षिप्त अहवाल

वि. सा. संघाच्या शाखांची संख्या केवळ २२ होती. आज हीच संख्या ७६ च्या घरात आहे. गडचिरोलीसारख्या आदिवासी क्षेत्रापासून तो बुलढाणा जिल्ह्यातील देऊळगावपर्यंत विदर्भात सर्वत्र या शाखा पसरल्या आहेत. विदर्भाच्या ग्रामीण भागातील नवा शिक्षित वर्ग मोठ्या औत्सुक्याने मराठी वाङ्मय आणि वाङ्मयीन चळवळी याकडे आकृष्ट होत आहे. हजाराच्या घरात असलेली वि. सा. संघाची सदस्यसंख्या हे त्याचेच प्रतिबिंब आहे. वि. सा. संघाच्या आजीव सदस्यांची संख्याच आज ८०० आहे.

विदर्भ साहित्य संघ म्हणजे केवळ नागपूर नव्हे. गेल्या तीन वर्षांत झालेली विदर्भ साहित्य संघाची बरोरा, मेहकर, अहेरी व घाटंजी येथील चार संमेलने, नांझा (जि. यवतमाळ) रिद्धपूर (अमरावती) भंडारा, भांबेरी (अकोला), पाटण (यवतमाळ) व वाडेगाव (अकोला) व परतवाडा येथील जिल्हा साहित्य संमेलने, कायर येथे झालेले नवोदित लेखकांचे संमेलन व बुलढाणा जिल्हा लेखिका संमेलन : या यादीवरून नुसती नजर फिरवली तरी लक्षात येईल की, नागपूरपेक्षा आता ग्रामीण भागात वि. सा. संघाचे वतीने मोठ्या प्रमाणावर कार्यक्रम होऊ लागले आहेत. तीन वर्षांत चार वार्षिक संमेलने घेऊन वार्षिक संमेलनाची खंडित झालेली परंपरा या वेगाने गतिशील झाली आहे.

'अभिव्यक्ती' या संस्थेच्या सहकार्याने वि. सा. संघाने नागपूरला एक लेखिका संमेलन घेतले होते. नुकतेच अकोला येथे वि. सा. संघाच्या वतीने अधिक मोठ्या प्रमाणावर मराठी लेखिका संमेलन झाले.

बालसाहित्य संमेलन, ग्रंथव्यवहार परिषद, पहिले अ. भा. मराठी विज्ञान साहित्य संमेलन, विदर्भातील कीर्तनकारांचे कीर्तन-सत्र, अन्य भाषांतील साहित्यिकांशी हिंदी साहित्य संमेलनात सक्रिय सहकार्य, अशा वेगवेगळ्या उपक्रमांना गती देता आली.

विविध साहित्यिकांचे सन्मान, ज्येष्ठ साहित्यिकांचे जन्मशताब्दीचे कार्यक्रम, अन्य संस्थांच्या वेगवेगळ्या

कार्यक्रमांना पुढाकाराने दिलेले सहकार्य, अशा किती तरी बाबी या कार्यकाळात घडल्या आहेत.

साहित्याच्या कक्षेबाहेर जाऊन व्यापक समाज प्रबोधनासाठीही वि. सा. संघाने या काळात काही गोष्टी जाणीवपूर्वक केल्या. शेतकऱ्यांचे प्रतिनिधी श्री. शरद जोशी यांची जाहीर मुलाखत, श्याम मानव यांच्या नेतृत्वाखाली अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे परिसंवाद, वर्धा येथील कुष्ठरोग समस्येवरील चर्चासत्र, मराठी भाषेवरील अन्यायाला वाचा फोडण्यासाठी डॉ. वि. भि. कोलते यांच्या नेतृत्वाखाली केलेले आंदोलन, यांचा या संदर्भात प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल.

वाङ्मयीनदृष्ट्या स्थायी आणि ऐतिहासिक महत्त्वाची दोन कामेही या कालात मार्गी लागली. एक म्हणजे नागपूर–विदर्भातील जुन्या पिढीतले गाजलेले कवी, कै. ज. के. उपाख्य बुवा उपाध्ये यांच्या समग्र कवितेचे संकलन व प्रकाशन आणि दुसरे म्हणजे वाङ्मय कोश–खंड दोनच्या नोंदीचे लेखन. पैकी बुवा उपाध्ये यांच्या कवितांचे संपादन डॉ. सौ. आशा सावदेकर यांनी केले असून वाङ्मयकोशाच्या नोंदीचे काम डॉ. वसंतराव वऱ्हाडपांडे यांच्या मार्गदर्शनाखाली पूर्णत्वाकडे जात आहे. वाङ्मयकोशाची ही जबाबदारी वि. सा. संघाकडे महा. राज्य संस्कृती मंडळाने सोपविली आहे. महाराष्ट्रातील इतर कुठल्याही संस्थेपेक्षा वि. सा. संघाचे या बाबतीतले काम अतिशय चोखपणे सुरू असल्याचे या कोशाचे मुख्य संपादक प्रा. के. ज. पुरोहित यांनी स्वतःच नमूद केले आहे.

साहित्यासोबतच इतर ललित कलाप्रकारांचे संयोजन व संगोपन हेही वि. सा. संघाचे एक महत्त्वाचे काम आहे, याची जाणीव ठेवून आयोजिलेले कै. राम गणेश गडकरी यांच्या जन्मशताब्दी वर्षातील वि. सा. संघाच्या नाट्य विभागासाठी सौ. अनुराधा जोशी व श्री. रमेश अंभईकर यांनी सूत्रबद्ध केलेला 'गडकरी दर्शन' हा कार्यक्रम आणि प्रा. दिलीप डबीर यांनी घडवून आणलेले धनवटे रंग मंदिरातील कीर्तनसत्र, हे या कार्यकाळात झालेले दोन उपक्रम वैशिष्ट्यपूर्ण ठरले. गडकऱ्यांच्या शताब्दी वर्षाच्या सांगता समारोहात 'गडकरी दर्शन' हा कार्यक्रम मुंबई, ठाणे व पुणे येथे करण्याची संधी वि. सा. संघाला मिळाली. ही या काळातील मोठीच उपलब्धी मानावी लागेल.

'रंग सावल्या' व 'गोल्डन गँग' या नाटकांचे विदर्भ साहित्य संघाच्या वतीने ठिकठिकाणी झालेले प्रयोग हीही गेल्या तीन वर्षांतील महत्त्वाची घडामोड आहे. नाटक व संगीत या दोन्ही क्षेत्रांत अजून बरेच काही करण्यासारखे आहे, याचे भान ठेवून आणखी प्रयत्नशील राहण्यास वि. सा. संघ वचनबद्ध आहे.

विविध कार्यक्रमांचे विकेंद्रीकरण, संदर्भ ग्रंथालय अधिक समृद्ध करणे, वि. सा. संघाच्या परीक्षांना वरच्या पातळीवर मान्यता मिळवून देण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणे, विदर्भातल्या कोणत्याही हौशी नाटक मंडळीला कै. नाना जोग यांच्या स्मृतीप्रीत्यर्थ उन्हाळ्यात धनवटे रंगमंदिर निम्म्या भाडेदरात उपलब्ध करून देणे, कायम कर्मचाऱ्यांच्या भविष्यनिर्वाह निधीमध्ये वाढ करणे, अन्य कर्मचाऱ्यांच्याही वेतनात वाढ करणे, अशी कालोचित आणि अत्यावश्यक पावले गेल्या तीन वर्षांत उचलली आहेत. विविध साहित्य प्रवाहांना वि. सा. संघाच्या कार्यातच स्थान देण्याचा प्रयत्न असून त्या दृष्टीने कार्यक्रमांची योजनाही केली आहे. आणि त्या सर्वांना रसिकांकडून अतिशय चांगला प्रतिसाद मिळाला आहे. अध्यक्ष या नात्याने ७६ पैकी बहुतेक सर्व शाखांना मी स्वतः भेटी देऊ शकलो आहे. जिल्हा पातळीवरील संमेलनामध्ये आमच्या प्रतिनिधींचा नेहमीच सक्रीय सहभाग राहिला आहे. व विदर्भात नवे वाङ्मयीन वातावरण तयार करण्यातही आम्हाला गेल्या तीन वर्षांत बऱ्याच प्रमाणात यश मिळाले आहे.

विदर्भाच्या साहित्य क्षेत्रातील अग्रणी संस्था, विदर्भ साहित्य संघ, या संस्थेची परीक्षा समिती गत ३० वर्षांपासून मराठी भाषेचा जाज्वल्य अभिमान बाळगून मराठी भाषेच्या प्रचार आणि प्रसाराचे कार्य अविरत करीत आहे. मराठी भाषा आणि वाङ्मय या विषयाची गोडी वाढविण्यासाठी तसेच महाराष्ट्रातील अमराठी भाषिकांमध्ये मराठीचा प्रचार आणि प्रसार करण्याच्या उद्देशपूर्तीसाठीच वि. सा. संघात परीक्षा समिती स्थापन करण्यात आली. योग्य अभ्यासक्रमानुसार परीक्षांचे आयोजन करण्यात येऊ लागले.

मराठी मातृभाषा नसणाऱ्या विद्यार्थांसाठी ६ वी ते १० वी पर्यंत अनुक्रमे मराठी प्रवेश, मराठी परिचय, मराठी बोध, म. प्रबोधिनी, म. प्रबोध आदी परीक्षा घेतल्या जातात.



अनुक्रमणिका






मराठी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थांसाठी ५ वी ते १० वी पर्यंत अनुक्रमे मराठी प्राथमिक, मराठी प्रारंभ, म. प्रारंभातर प्रवें विनीत, साहित्य विनीत प्रथम खंड व साहित्य विनीत द्वितीय खंड आदी विद्यालयीन, साहित्य परिचित प्रथम खंड व साहित्य परिचित द्वितीय खंड, आदी कनिष्ठ महाविद्यालयीन व भाषा स्नातक, साहित्य स्नातक, साहित्य विशारद आदी पदव्युतर परीक्षांचे आयोजन केले जाते.

तत्कालीन मध्यप्रदेश या द्विभाषिक राज्यातील शासन व शिक्षण खात्याकडून मराठी विनीत या परीक्षेला विशेष मान्यता प्राप्त करून घेतली होती. साहित्य स्नातक परीक्षेसाठी विद्यापीठाची मान्यता मिळवून अमराठी प्राध्यापकांना मराठी माध्यमातून शिकविण्यासाठी साहित्य स्नातक ही पदवी अनिवार्य केली होती. १९६९ मध्ये परीक्षा समितीने एक महत्त्वाचे पाऊल उचलले, ते म्हणजे अमराठी शासकीय कर्मचारी व अधिकाऱ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या मराठी प्रवीण (निम्नस्तर) व मराठी प्राज्ञ (उच्चतर) या दोन विशेष परीक्षांचे आयोजन. त्यासाठी महाराष्ट्र शासनाकडून मान्यता प्राप्त करून घेण्यात आली.

संस्थेच्या हीरक महोत्सवी वर्षात (१९८२-८३) साहित्य वाचस्पती (डी. लिट. समकक्ष) ही परीक्षा सुरू करण्यात आली. १९८० मध्ये अमराठी भाषिकांसाठी भाषा परिचय वर्गाचे आयोजन करण्यास सुरुवात केली. तीन महिन्यांचा हा अभ्यासवर्ग निःशुल्क घेतला जातो. परीक्षार्थीसाठीही मार्गदर्शन करणारे वर्ग घेतले जातात. तद्वतच 'मराठी प्रवीण व मराठी प्राज्ञ' ह्या परीक्षार्थ्यासाठीही मार्गदर्शन करणारे वर्ग घेतले जातात. त्याचा फायदा मोठ्या प्रमाणावर घेतला जातो. परीक्षा समितीचा कार्यविस्तार विदर्भातच नव्हे, तर महाराष्ट्रात पसरला आहे. विदर्भातील केंद्राची संख्या ८५ असून प्रतिवर्षी ६,५०० ते ७,००० विद्यार्थी विविध परीक्षांना बसतात. महाराष्ट्रातील महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, मुंबई मराठी साहित्य संघ मुंबई, आदी संस्थांद्वारेही मराठी परीक्षांचे आयोजन होत असे. परंतु कालांतराने त्यांच्या परीक्षा जवळजवळ बंद झाल्या. गेली ३८ वर्षे सातत्याने परीक्षा संचालन करणारी विदर्भ साहित्य संघ ही एकमेव संस्था आहे.

सन १९५१-५२ मध्ये विद्यार्थी संख्या-५७१
सन १९८४-८५ मध्ये विद्यार्थी संख्या-६२०४

## नवे आजीव सभासद

### (फेब्रुवारी १९८६ ते जून १९८६ पर्यंत)

### पुणे

शुभश्री चंद्रशेखर काळे, महादेव गाडगीळ, शुभांगी वझे, दीप्ती गुळुमकर, जयश्री कोटिमास्कर, विभावरी बापट, अरुणा पारसनीस, शुभलक्ष्मी जोशी, अरविंद साठे, कमल जगताप, विनायक घारपुरे, अनिलकुमार देशपांडे, सतीश जोशी (जुन्नर), अनंत गोखले, स्मिता आपटे, वर्षाराणी भुरके, अनुराधा रामचंद्र आफळे, आशा वैद्य, रा. ल. शेटे, नीला विजय कदम, मालती मनोहर संगमनेरकर- मीरा विनायक पावनगडकर, रोहिणी वासुदेव बापट, राम कोलारकर (पिंपरी)

न. शे. पोहनेरकर / सुधाकर अहंकारी

# मराठवाडा साहित्य परिषद : प्रारंभ आणि विकास

हैदराबादेत सन १९४० मध्ये 'मराठी मंडळ' संस्थेची स्थापना झाली. केवळ मराठीच्या अभ्यासासाठीच महाराष्ट्र-साहित्य परिषदाच्या प्रथमा, प्राज्ञ, विशारद, आचार्य या परीक्षांच्या वर्ग बंधु-भगिनींसाठी चालविता यावे-म्हणून सन १९४० साली 'मराठी मंडळ' ही आजच्या मराठवाडा साहित्य परिषदेची गंगोत्री प्रारंभ झाली. घटना, नियम शाखोपशाखा या अशा कागदी कसरतीस तेथे वाव नव्हता. होती ती केवळ जिद्द, काहीतरी भरीव कार्य झालेच पाहिजे हा मूळचा हेतू !

विवेकवर्धिनी शिक्षणसंस्था ही हैद्राबादेतील एक प्रमुख खाजगी शिक्षणसंस्था ! तिचीच एक शाखा डॉ. डावरे प्राथमिक शाळा सुलतान बाजारात उघडली गेलेली. योगायोगाने या प्राथमिक शाळेचा मुख्याध्यापक मीच नेमला गेलो. विवेकवर्धिनी संस्थेचे मुख्याध्यापक श्री. वासुदेवराव हर्डीकर ! अर्थात् मराठी मंडळाचे अध्यक्ष व चिटणीस म्हणून आम्हा उभयतांची नात्रे सर्वांनी ठरविली. वरच्या वर्गाच्यासाठी जागा डॉ. डावरे स्कूल मध्येच ठरविण्यात आली. सकाळी ७–३० ते ८–३० ही वर्गाची वेळ. अगदी आरंभी महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे यांच्या 'प्राज्ञ' या परीक्षेचा वर्ग इ. स. १९४१ मध्ये चालू करण्यात आला. या वर्गास अध्यापक म्हणून श्री. शंकर दिगंबर जोशी, श्री. द. कृ. देशमुख, श्री. भा. शं. कहाळेकर आणि मी अशी चारच माणसे होतो. पहिल्या वर्षी एकूण १६ विद्यार्थी प्राज्ञ परीक्षेस बसले. सर्व परीक्षांच्या वर्गाला बसलेल्या विद्यार्थ्यांची एकूण संख्या २७ होती. प्राज्ञ वर्गातील १६ विद्यार्थ्यांपैकी ११ विद्यार्थी पहिल्यावर्षी उत्तीर्ण झाले. त्यावेळचे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे चिटणीस श्री. वा. दा. गोखले यांनी या अभ्यास वर्गांना खूपच मार्गदर्शन व सहकार्य केले. परीक्षा संपून त्यांतील उत्तीर्ण विद्यार्थ्यांच्या प्रशस्तीपत्राचे वितरण अंगतीपंगतीच्या स्वरूपात राजे प्रतापगीरजी बहादूर यांच्या भव्य प्रासादात झाले. डॉ ना. गो. नांदापूरकर, श्री. वासुदेवराव हर्डीकर, प्रा. र. म. भुसारी, प्रा. रा. ब. माढेकर अशी हैद्राबादी असणारी अभ्यासू, थोर साहित्यिक विचारवंत मंडळी पाठीशी होतीच. संपूर्ण १२ वर्षे हा अध्यापन यज्ञ चालू होता. विद्यार्थी व अध्यापक दोघांच्याही संख्येत वाढ होत होती. शेवटच्या म्हणजे बाराव्या वर्षी ही संघटना जेव्हा नावारूपाला आली त्यावेळी प्रा. र. म. भुसारी, डॉ. ना. गो. नांदापूरकर, प्रा. श्री. रं. कुलकर्णी, प्रा. वि. पां. देऊळगावकर, प्रा. कहाळेकर, श्री. न. शे. पोहनेरकर, श्री. यशवंत कानिटकर, प्रा. भगवंत देशमुख, सर्वश्री मधु माधव पीलखाने, बाबूराव देशपांडे, शंकरराव व किशनराव पोहनेरकर, मधुकर टोपे, प्रा. सौ. मायाबाई सरदेसाई, श्री. शामराव वाघमारे, कु. सुंदर अंबेकर (श्री. वसुधा पाटील) कु. उषा भोसीकर (प्रा. उषा जोशी) हे होते.

परिस्थितीचे पाश आवळले जात असतानाही तरुण मनांना कार्य प्रवण करणाऱ्या कार्यकर्त्यांचा एक संच 'मराठी मंडळा'ने तयार केला. 'मराठी ग्रंथ संग्रहालय, 'विवेकवर्धिनी पाठशाळा' या संस्था वर्गासाठी कायमची सोय करीत होत्याच ! वर्गाच्या शेवटच्या नोंदीत १५ नवे जुने शिक्षक लाभले तर विद्यार्थ्यांची संख्या अर्धशतक ओलांडू लागली. अनेक थोर साहित्यिकांशी परिचय, विचारविनिमय झाले. हैद्राबादी जेव्हा केव्हा एखादा योग्य व विद्वान मराठी माणूस येई त्या वेळी त्या लोकांना मराठी मंडळात निमंत्रित करण्यात येई. असा समारंभ मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या सभागृहात होई. इतर वेळी मराठी मंडळाच्या अधिकृत कार्यालयात (?) होई मराठी मंडळाचे अधिकृत कार्यालय होते कुठे ? माझ्याच राहत्या कवेलूच्या घरातील १२×१५ च्या एका खोलीत ! शिंदीचे विणलेले दोन बोरे व

त्यावर तरटे ! ही आमची बैठक ! कुणीतरी यावयाचा असेल तर पाठीमागे टेकायाला एक दोन वळकटया लोडासारख्या ठेवून दिल्या की काम संपले ! दररोज संध्याकाळी तेथे कार्यकर्त्यांची बैठक व योजना चालत असत. मराठी मंडळाच्या कार्यालयाचे नाव ' मराठवाडी' असेच ठेविले गेले. ही कल्पना श्री. कहाळेकर यांची. पुढे ' मराठवाडी ' याच नावाने आजूबाजूची घरेही ओळखली जायची. पुढे पुढे पत्रव्यवहार आणि आवकजावक खूप वाढली. मूळ घरमालकाचा घरचा पत्ताही मराठवाडी घर नं. १२८ सुलतानबाजार हैद्राबाद (दख्खन)' या नावाने सर्व परिचित झाला. इतका हा पत्ता सर्वमान्य सर्वज्ञात झाला.

हैद्राबादेला होणाऱ्या सर्व साहित्यिक चळवळींत मराठी मंडळ सहभागी असे. या ना त्या निमित्ताने आलेल्या मान्यवर पाहुण्यांना साहित्यिक मंडळात बोलावून कार्यकर्त्यांशी त्यांचा परिचय करून देण्यात येई.

आता मराठी मंडळाची कार्यक्षमता वाढली होती. पुन्हा संमेलनाची आवश्यकता भासू लागली. कारण केवळ हैद्राबाद करता हा नंदादीप पाजळीत बसणे म्हणजे त्यात तोच तोपणा येऊन उत्साहाची आंच संथ होण्याची भीती होती. १९४४ ला पुन्हा अनेक प्रयत्न वशिले सुरू करून निजाम प्रांतीय मराठी साहित्य संमेलनाचे दुसरे अधिवेशन नांदेड येथे घेण्यात आले. अध्यक्ष होते म. म. दत्तो वामन पोतदार ! मराठी मंडळालाही मर्यादा होत्या. आता मराठवाड्याच्या पातळीवर काही झाले तरच या नवीन मनाचा उत्साह टिकणार होता. म्हणून ' मराठवाडा साहित्य परिषद ' या नावाने संस्था निर्माण केली. ' मराठी मंडळ ' परिषदेत विलीन झाले. आणि तेथेही सर्वार्थाने काम करणारी माणसे तीच. साधने तीच. परंतु आता ही जिद्द जिल्हा तालुक्यापर्यंत जावी म्हणून प्रचार शाखांची स्थापना, अभ्यासवर्गाची निर्मिती अशा सर्व प्रकारे प्रारंभ क्षेत्र विस्तृत मिळताच तरुण मनांचा उत्साह पुन्हा वाढत गेला. ठिकठिकाणी शाखा व यानंतर संमेलने यांनी चांगलाच व्याप वाढला. स. १९४५ ला लागलीच तिसरे संमेलन घेतले ते श्री. भाऊसाहेब माडखोलकरांच्या अध्यक्षतेखाली आणि येथपासून पुढे अध्यक्षांची आयात बंद करण्यात आली. मराठवाड्याच्या अस्मितेला आत्मविश्वासाची ग्वाही पटावी म्हणून या पुढील सर्व संमेलनांचे अध्यक्ष मराठवाड्यातील नामवंत अभ्यासकातून निवडले गेले. अध्यक्षीय निवडणुकादेखील खुल्या किंवा गुप्त अशा कसल्याही मतदानाने होत नव्हत्या. ज्येष्ठता आणि अभ्यास हीच त्याची कसोटी असल्याने कधीच कुणाला असंतुष्ट होण्याचे कारण नव्हते. अशा प्रकारे मराठवाडा साहित्य परिषदेचा संसार हैद्राबादच्या राजधानीत आत्मगौरवाने व डौलाने साजला व गाजला. मराठवाड्याच्या कितीतरी जिल्हा तालुक्यानून ही वार्षिक संमेलने भरली. जनतेने सहकार्याचा प्रतिसाद अपेक्षेबाहेर दिला. हेच परिषदेचे मुख्य व सर्वश्रेष्ठ भांडवल होते. अभ्यासकेंद्रे चालवीत असतानाच स्थानिक अभ्यासकांच्या व परिश्रमांच्या प्रसिद्धीचे अत्यावश्यक साधन म्हणून ' प्रतिष्ठान ' हे मुखपत्र परिषदेने १९५२ ते ५३ सुरू केले. संशोधन कार्याचीही पताका मराठी मंडळाने रोवलेली होतीच. महाराष्ट्राने केवळ ऐकलेल्या पण डोळयाने न पाहिलेल्या अशा श्री. न. शे. पोहनेरकर संपादित ' दासोपंताच्या पासोडी 'चे अर्थात मराठी शारदेच्या महावस्त्राचे प्रकाशन यासारखी प्रकाशने प्रकाशित केली. ' मराठवाडा साहित्य परिषद ' आता सर्वार्थाने स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण अशी संस्था म्हणून महाराष्ट्रात गाजली. परिषदेच्या जवळील ग्रंथ संग्रह मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थेस देण्यात आला. हैद्राबादी राहिलेल्यांनी ही पताका पुनश्च आपल्या खांद्यावर घेतली आणि मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश या नावाने पुनश्च ' हरिॐ ' म्हणून नव्या उमेदीने कार्यास प्रारंभ केला. ' पंचधारा ' हे नियतकालिकही सुरू केले. परिषदेच्या संग्रहातील संशोधनात्मक हस्तलिखिते ही हैद्राबादेतील बांधवाच्या स्वाधीन करून कालांतराने परिषद् औरंगाबादी आली.

मराठवाडा साहित्य परिषदेची स्थापना १९४३ साली झाली. हैद्राबाद राज्यातील मराठी भाषिकांची मराठी साहित्य, संस्कृती आणि शिक्षण या क्षेत्रात कार्य करणारी प्रातिनिधिक संस्था म्हणून या संस्थेने कार्यास आरंभ केला. मराठवाड्यावर अधिसत्ता गाजविणारी निजामी राजवट ही सरंजामी पद्धतीची, एकतंत्री आणि अतिशय जात्यंध होती. मराठी भाषेच्या अभ्यासाची शाळा-कॉलेजात सोय नव्हती. राज्य व्यवहारात उर्दू भाषेचा वरचष्मा होता. या काळात म्हणजे साधारणपणे १९३५ च्या नंतर हैद्राबाद राज्यात राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ सुरू झालेली होती. तिचा झपाट्याने प्रसार होत होता.

...४

नवजागरण घडत होते. राष्ट्रीय शिक्षण संस्था स्थापन केल्या जात होत्या. हैद्राबाद, नांदेड, औरंगाबाद, अंबाजोगाई, गुंजोटी या भागातून स्थापन झालेल्या अशा संस्थांमधून मराठी भाषेच्या आणि संस्कृतीच्या शिक्षणाची सुरुवात केली जात होती. पुण्या-मुंबईकडील आणि वऱ्हाडातील मराठी साहित्यकांची व्याख्याने, सभासंमेलने आयोजित केली जात होती. हैद्राबाद येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षांचे वर्ग सुरू झाले होते. हैद्राबाद संस्थानात 'हैद्राबाद मराठी साहित्य परिषद' अशासारखी एखादी संघटना असावी हा विचार या काळात वळावला. हैद्रावादेतील 'वाग्विलास मंडळा'च्या पुरस्काराने निजाम प्रांतीय मराठी साहित्य संमेलन भरविण्याचे निश्चित झाले. मराठी साहित्याच्या क्षेत्रात काम करणारी मंडळी स्वातंत्र्य चळवळीशी संबंधित असल्यामुळे मराठी साहित्याची चळवळ ही सरकारविरोधी आहे असा निजामी राजवटीचा समज होता. त्यामुळे हे मराठी साहित्य संमेलन भरविण्यास सरकारने बरेच अडथळे निर्माण केले. त्यातून मार्ग काढून १ ऑक्टोबर १९३७ रोजी श्री. बाळकृष्ण गणेश खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली पहिले साहित्य संमेलन संपन्न झाले. त्यानंतर १९४३ साली म. दत्तो वामन पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली, सप्टेंबर १९४३ मध्ये दुसरे मराठवाडा साहित्य संमेलन घेण्यात आले आणि मराठवाडा साहित्य परिषदेचे पहिले कार्यकारी मंडळ स्थापन करण्यात आले. १९४७ पर्यंत हैद्राबाद, औरंगाबाद, नांदेड या ठिकाणी तीन संमेलने झाली. मराठवाडा साहित्य परिषदेच्या कार्याला एक व्यवस्थित रूप त्या काळात प्राप्त झाले. त्या काळातील संमेलनांमधून १) शिक्षणाचे माध्यम मराठी असावे. २) राज्य व्यवहारात मराठीला स्थान मिळावे. ३) मराठी ग्रंथालयांची वाढ व्हावी. ४) आणि मराठी वृत्तपत्रांवरील आणि साहित्यावरील बंधने दूर व्हावीत अशा प्रकारचे ठराव संमत करण्यात आले. अनेक ठिकाणी साहित्य परिषदेच्या शाखा स्थापन झाल्या. परीक्षा केंद्रे चालू करण्यात आली आणि परिषदेने प्रकाशन कार्याला आरंभ केला. मराठवाडा साहित्य परिषद या संघटनेला अशा प्रकारे स्थायी रूप देण्यात श्री. श्रीपतराव पळनीटकर, सौ. सुशिलाबाई फाटक, न. शे. पोहनेरकर, वि. के. कोल्हटकर, र. लु. जोशी, कानोले, वि. पां. देऊळगांवकर इ. व्यक्ती आणि मराठी मंडळ, बाल हनुमान संघ, वाग्विलास मंडळ इ. संस्था यांचा फार मोठा वाटा आहे.

१९४७ साली भारत स्वतंत्र झाला. हैद्राबाद संस्थान त्यानंतर थोड्याच काळात भारतात विलीन झाले. त्यानंतर म्हणजे १९५१ साली परभणी येथे मराठवाडा साहित्य संमेलन झाले. नव्या उत्साहाने मराठवाडा साहित्य परिषदेच्या कार्यास सुरुवात झाली. मोठ्या प्रमाणात सभासद नोंदणी करण्यात आली. शाखा स्थापल्या गेल्या. परीक्षा केंद्रे चालवली जाऊ लागली. जागजागी वाङ्मयीन कार्यक्रम आयोजित करण्यात आले. या काळात म्हणजे १९५१ नंतर सलगपणे हैद्राबाद, परळी, लातूर, उदगीर या ठिकाणी वार्षिक संमेलने (अधिवेशने) झाली. श्री. बाबासाहेब परांजपे, डॉ. नांदापूरकर, दिवाकर कृष्ण केळकर, दे. ल. महाजन यांच्यासारखे मराठीचे मानकरी या संमेलनांना अध्यक्ष लाभले. या काळात जिल्हा पातळीवर संमेलने भरवली जाऊ लागली. मराठवाडा साहित्य परिषदेने साहित्य परिचय, बोध, प्रवेश या स्वतःच्या परीक्षा चालू केल्या. विविध ठिकाणी वाङ्मयीन शिबिरे आयोजित केली. प्रकाशनाच्या क्षेत्रात साहित्य परिषदेने १९५० च्या नंतर भरीव कामगिरी केली. दासोपंतांची पासोडी, मुक्तमयुरांची भारते, सौंदर्याचे व्याकरण, पुन्हा नभाच्या लाल कडा, यासारख्या संशोधन, समीक्षा आणि ललित साहित्य क्षेत्रातील अनेक पुस्तकांचे प्रकाशन साहित्य परिषदेने केले. १९५३ साली सप्टेंबर महिन्यामध्ये साहित्य परिषदेने 'प्रतिष्ठान' या नियतकालिकाच्या प्रकाशनाचा शुभारंभ केला.

राज्यपुनर्रचनेनंतर मराठवाडा संयुक्त महाराष्ट्राशी एकरूप झाला. मराठवाडा साहित्य परिषदेचे मध्यवर्ती कार्यालय हैद्राबादहून औरंगाबादला आले आणि पुन्हा नव्या उत्साहाने साहित्य परिषदेच्या रचनेला सुरुवात झाली. औरंगाबाद येथे परिषदेच्या मध्यवर्ती कार्यालयाची वास्तू उभी करण्यात आली. मराठवाडा विद्यापीठाची स्थापना झाल्यानंतर अनेक मराठी साहित्यिक आणि मराठीचे अभ्यासक औरंगाबादेस जमले. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाला, निर्मितीला अनुकूल वातावरण निर्माण झाले. संशोधन कार्यास जोमाने सुरुवात झाली.

मराठवाडा साहित्य परिषदेने गेल्या दोन दशकांत नियोजनपूर्वक लक्षणीय कार्य केले आहे. नियमितपणे परिषदेने साहित्य संमेलने भरविली, नानाविध वाङ्मयीन प्रकल्प राबविले. नियमितपणे अभ्यास मंडळ चालविले. वाङ्मयीन परीक्षा केंद्रे वाढविली. प्रतिष्ठानमधून

अभिजात साहित्य सतत प्रकाशित केले. संशोधनाच्या क्षेत्रातही भरीव कामगिरी करण्यात आली. समीक्षा, कथा, कविता, संशोधन ग्रंथ इत्यादी विषयांवरील अनेक ग्रंथांचे प्रकाशन केले. एक निश्चित भूमिका समोर ठेवून आज मराठवाडा साहित्य परिषद वाटचाल करीत आहे.

मराठवाडा साहित्य परिषदेच्या योजना : १९८४ साली मराठवाडा साहित्य परिषदेची वर्तमान कार्यकारिणी निवडून आली. श्री. ना. धों. महानोर यांच्या अध्यक्षतेखाली या कार्यकारिणीने परिषदेच्या विकासाच्या योजना राबविण्यास सुरुवात केली आहे. नरहर कुरुंदकर, वी. रघुनाथ, कुसुमाग्रज, म. भि. चिटणीस यांच्यासारख्या प्रसिद्ध साहित्यिकांच्या नावे वाङ्मयपुरस्कार योजना जाहीर केल्या आहेत. यशवंतराव चव्हाण नाट्यगृहाचे बांधकाम चालू आहे. भव्य अशा संदर्भ ग्रंथालयाची उभारणी करण्याचा प्रयत्न चालू आहे. थोड्याच काळात १६ वे साहित्य संमेलन आयोजित करण्यात येत आहे. तालुका आणि जिल्हा पातळीवर कविसंमेलने आणि साहित्य संमेलने आयोजित केली जाणार आहेत. 'प्रतिष्ठान' नव्या जोमाने प्रकाशित होत आहे. परीक्षा विभागाची पुनर्बांधणी करून परीक्षा केंद्रे वाढविण्याचे कार्य चालू आहे. अनेक ठिकाणी नवीन शाखा उघडल्या जात आहेत. परिषदेच्या या विकास कार्याला साहित्य रसिकांचा, साहित्यिकाचा प्रचंड प्रतिसाद मिळत आहे.

## नवे आजीव सदस्य

### पुण्याबाहेरील

पंडित टापरे, माणिकचंद्र ओसवाल (वाई), भय्यासाहेव देशमुख, वसुंधरा देशमुख, प्रियवंदा, देशमुख (सातारा) अच्युत हरिभाऊ वाकडे (करवडी, सातारा), भालचंद्र विष्णु धर्माधिकारी (सातारा) शिवशंकर उपासे (आजरा, कोल्हापूर), वृषाली सुधीर तारे (अहमदनगर), गोवर्धन शाह, भगवान ठाकूर, पी. डी. पाटील, सुभाष दीक्षित, विश्वासराव पाटील, ज्योती प्रकाश गायकवाड, सुधाकर राव, भानुदास पाटील, भालचंद्र मुसळे, वसंत घासकडवी, किशोर शांताराम देशपांडे, विलास किसनराव करडक, जयंत बाबूराव रणसिंग, पुरुषोत्तम भिकाजी कुळकर्णी, सुधाकर जगन्नाथ रनाळकर (सर्व धुळे), प्रभाकर तिळवणकर (जळगाव), वि. ह. भुमकर, श्यामसुंदर जोशी, अशोक बागवे, ह. श्री. परांजपे (सर्व ठाण्याचे) रेवणसिद्ध सिद्रमप्पा पाटील, राजकुमार शहा, रा. व्यं. छत्रपती (सर्व सोलापूरचे), बाबाराव बोंडगे (लातूर), प्रभाकर भावे (विलेपार्ले), पंढरीनाथ पाटील (मुंबई), प्रतिभा पंजाबराव इंगोले (दर्यापूर, अमरावती), सुशीला पाटील (अमरावती), विश्वास प्रभाकर वसेकर (परभणी) अक्षयकुमार काळे (नागपूर), नितीन जे. व्यास (बडोदा).

प्रा. द. पं. जोशी

# मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश

१९५६ साली राज्य पुनर्रचना झाली व एक नवीन राज्ययंत्रणेची चौकट भारतात अस्तित्वात आली. भाषा हा प्रधान घटक म्हणून राज्याच्या व्यवस्थेला सूत्र मिळाले. या घटनेचे लोकजीवनात विविध स्वरूपाचे परिणाम अपेक्षित होते. तसे ते हैदराबादेत व आंध्रात झालेही. आंध्रात तर १९१४–१५ पासून भाषावार प्रांतरचनेची मागणी होत होती. योगायोग असा की त्या कल्पनेचे बलदंड पुरस्कर्ते ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं. केतकर हे होते. १९१५ साली त्यांनी मद्रासेत व सबंध आंध्र विभागात ठिकठिकाणी हिंडून भाषिक राज्य-पुनर्रचनेचा पाठपुरावा केला. त्यांच्या उत्साही प्रतिपाद-नाला उदंड पाठिंबा मिळाला. पुढे त्याच कल्पनेचा विस्तार होत गेला. म्हणजे आंध्र जनतेच्या दृष्टीने ती १९५६ सालची घटना एक अपरिहार्य ऐतिहासिक परिणती होती. तर हैदराबादेतील व मराठवाड्यातील महा-राष्ट्राच्या एकीकरणासाठी स्वयंस्फूर्त व प्रगमनशील भूमिकाही विसाव्या शतकाच्या आरंभापासून सातत्याने प्रकट झाली होती. निझामाच्या राजवटीत स्व-भाषेतून शिक्षण व तिचे संवर्धन हा केवळ लढ्याचा भाग नव्हता तर सबंध समाजाच्या हालचालीचा, जागृतीचा मान-बिंदू होता. त्या हुंकारातूनच १९०८ ते १९५५ पर्यंतच्या अनेकविध घटना घडत गेल्या होत्या. शिक्षणसंस्था, वाचनालये, सभा-संमेलने, धार्मिक सण-उत्सव, सामाजिक सुधारणा या सगळ्यांचे सूत्रचालन करताना येथील नेत्यांनी, कार्यकर्त्यांनी, सामान्य जनतेचे आपल्या मातृ-भाषेच्या सेवेचे व्रत क्षणभरही दृष्टीआड केले नाही. मिळेल ते साधन, सापडेल तो क्षण, जमेल तेवढी शक्ती यांच्या संयोगातून जवळजवळ अर्धशतक सांस्कृतिक चळवळ हैदराबादेत उभी राहिली. त्याचे सूक्ष्मातिसूक्ष्म स्वरूप लक्षात घेतले तर ध्यानात येईल की ती स्वयंप्रज्ञ होती. तशीच स्वयंस्फूर्त होती. त्यात अनुकरणाचा भाग नव्हता. परप्रेरणेचा प्रश्नच नव्हता. तसा काही प्रकार असता तर ती केव्हाच उद्ध्वस्त झाली असती. या प्रेरणेचा वारसा येथील समाजाने स्वातंत्र्याच्या युगात प्रवेश करताना उरात जपला. त्यामुळे १९५६ साली राजकीय चौकट कशीही बदलली, कितीही पालटली तरी आंध्र समाज काय, मराठी समाज काय किंवा येथील अन्य सांस्कृतिक घटक काय यांच्यातील नाते भावनिक होते व ते आदर्शाशी घट्ट बांधलेले होते. त्यामुळे १९५६ मध्ये कुणीही भांबावले नाही, नंतरही कुणी काळजी करावे असे काही घडले नाही. ज्याचा 'स्व'वर विश्वास असतो त्याला कधीच कुणाचे भय वाटत नाही, वाटले नाही, व वाटणार नाही म्हणून जेव्हा नांदापूरकर म्हणतात, "आम्ही मराठे हिचे पुत्र लोकी कधी भ्यावयाचे मुळी ना कुणा" ते उगीच नाही.

पण केवळ स्वतत: दंग होऊन 'स्व'ची पूजा हा खरा 'स्व'चा अर्थ नव्हे, स्व–धर्म तर नव्हेच नव्हे. काळा-नुरूप, प्रसंगानुरूप साध्य साधनांचा विवेक करावा लागतो. सांस्कृतिक आदर्शाचे सतत निरीक्षण, परीक्षण करावे लागते, संदर्भ बदलतात. ध्येयबिंदूवरची अचल दृष्टी न ढळू देताही हे शक्य आहे. मुख्य म्हणजे स्वतः-बद्दलच्या कल्पनांची तपासणी, फेरतपासणी, आत्मपरी-क्षण करीत हे करावयाचे. हे त्यामागील महत्त्वाचे सूत्र आहे. आंध्र प्रदेश हा महाराष्ट्राचा युगायुगाचा जीवलग प्रांत. या दोन प्रदेशांनी भारताचा भूगोल तोलला आहे व इतिहास पेलला आहे. याचा विस्तृत तपशील देण्याची या ठिकाणी आवश्यकता नाही. त्यात पुन्हा गेली पाचशे वर्षे येथे मुस्लिम समाज राज्यकर्ते व संस्कृती नांदली. त्यांच्या ऐतिहासिक कार्याबद्दल कुणाचे निष्कर्ष काही असोत पण येथील संस्कृतीप्रवाहातील त्यांचे महत्त्वाचे योगदान आम्हाला जाणवतेच आहे. या तीन ठसठशीत परंपरेप्रमाणेच इतरही प्रवाह आहेतच.

१९५६ मध्ये पहिला प्रश्न उपस्थित झाला की पुढे कसे जायचे ? पुढे काय ? हा तो प्रश्न नव्हता. लक्षात

आलेला भाग असा की या तीन प्रवाहांतून केवढे धन व संचित जमा झालेले आहे. मग ते लोकमानसातले असो वा हस्तलिखितातले असो, ग्रंथांतर्गत असो वा वास्तुबद्ध असो वा लोकवाणीतले असो, त्या सर्वाची नीट जुळणी, मांडणी, मीमांसा, मूल्यमापन, अभ्यास, संग्रह हे आपले प्रथम कर्तव्य आहे. त्यात व्यक्तिविचार आहेत व सामाजिक चळवळी आहेत. दूरस्थ कोपऱ्यात झोपलेली कलावस्तू आहे, तशीच अज्ञात मठमंदिरातील शिल्पकला आहे. या सर्वांचे आलोकन आकलन करायचे ते प्रेमाने, निष्ठेने, श्रद्धेने, पण आंधळ्या दृष्टीने नव्हे. शास्त्रीयत्वाला बाधा न येऊ देता व सर्वसमावेशकतेला तडा न जाऊ देता आधुनिकतेचे सर्व पथ्यपाणी सांभाळून हे करायचे आहे. हे सगळे जमेल तसे करायचे, पण करायचे. काही गोष्टी इतर मंडळी जरूर करतील, करू द्यात. कुणाला आडवे न येता किंवा कुणाला आडवे न जाता आपणाला करता येण्याजोगे कार्य अफाट आहे. याची जाणीव मराठी साहित्य परिषदेने ठेवली. साधने शून्य, अनुकूलता बेताची, पण सर्वांचे सहकार्य उदंड, अशा काहीशा संमिश्र भावनेने परिषदेने १९५७-५८ साली पुनःश्च 'हरि ॐ' म्हणून कार्याला आरंभ केला.

'पंचधारे'चा उगम झाला तो त्याच भावनेतून. त्यात इतरही प्रेरणा होत्याच, पण ही महत्त्वाची होती. आज १९८६ साली 'पंचधारे'चा विकास हा महाराष्ट्रासमोर, भारतासमोर आहे. परिषदेने या ३० वर्षांत हेतुपूर्वक विचार करून, विषय निवडून, लेखक निवडून वैचारिक व संशोधनात्मक अशी ३० पुस्तके प्रकाशित केली. तीही त्याच दृष्टीतून. त्यात एका बाजूला प्राचीन सातवाहनांच्या कालकर्तृत्वाची मीमांसा आहे. मध्ययुगीन धर्मविचारांची चर्चा आहे तर दुसरीकडे दक्षिणेकडील यक्षगान परंपरेचा अभ्यास आहे. एका बाजूने हैदराबादचा गेल्या शंभर वर्षांचा सर्वांगीण इतिहास आहे. तसाच तेलुगु भाषेतील लोककथांचा संग्रह आहे. सीमाप्रदेशातील मिश्र संस्कृतीच्या प्रभावातून निर्माण झालेल्या लोकगीतांचा संग्रह आहे, अभ्यास आहे. जे द्यायचे करायचे ते एका निश्चित विचाराने, दृष्टीने. मराठी शारदेचे वैभव वृद्धिंगत व्हावे या हेतूने व मराठी संस्कृती संपन्न व्हावी या दृष्टीने. मराठीत काय नाही याची कल्पना असतेच. त्या उणिवेवर चर्चा करीत बसण्यापेक्षा ती उणीव आपल्या परीने भरून काढणे ही गोष्ट आम्हाला अधिक महत्त्वाची व मोलाची वाटते आणि खरं सांगायचे म्हणजे आणखी खूप खूप पुढे जायचे आहे.

परिषदेच्या कार्यात प्रबल राहिलेले दुसरे सूत्र म्हणजे भाषिक साहचर्याचे व संपर्काचे. ही संकल्पना तशी सार्वत्रिक व सर्वप्रचलित झाली आहे. पण याबाबतही काही नेमकेपणा आणण्याचा प्रयत्न परिषदेने पंचधारा त्रैमासिकाच्या द्वारे केला. साहित्यनिर्मिती, ज्ञानसंवर्धन व संस्कृती विकास हा अत्यंत गुंतागुंतीचा प्रकार असतो व तो एकाच भाषेच्या निरपवाद सामर्थ्यावर कधी उभारलेला नाही, चाललेला नाही. महत्त्व आहे ते निर्मितीला, तिच्या वेगळेपणाला. मग भाषा माध्यम व आकार परिवेष कसाही असो, कुठलाही असो. त्या निर्मितीतला कलात्मक व मानवी हुंकार समजणे व अन्य रसिकांत संक्रमित करणे ही संस्कृती संवर्धनातील निर्णायक खूण 'पंचधारे'ने मानली. या जाणिवेच्या आकलनावर मराठीचे बळ वाढते व वाढावे. या बळातून अन्य भाषा समूहांनाही सामर्थ्य लाभावे हेही सूत्र आम्ही मानले. त्यात परिचय परामर्शापेक्षा प्रश्नांची चर्चा, उलगडा, सततचा संवाद, सहकार्य व स्वप्नांचे साहचर्य महत्त्वाचे. म्हणजे केवळ आदान प्रदानाने हा प्रश्न संपत नाही तर त्याचा आरंभ होतो. या कल्पनेतून पंचधारेचे संपादन १९५८ सालापासून चालत आलेले आहे. या त्रैमासिकाने महाराष्ट्रातील मराठी मंडळींचा विश्वास संपादन केला. त्या बाबींबरोबरच दक्षिण भारतातील विविध क्षेत्रांतील मंडळीच्या मनातही आपुलकी निर्माण केली. यावरून आम्हाला दिलासा मिळाला आहे. 'पंचधारे'ने मराठीला काय दिले याचा आढावा आम्ही घेणे बरोबर नाही. कारण आम्हीच आमचे कठोर टीकाकार आहोत. पण असंख्य प्रकल्पांपैकी मराठीत आणलेल्या नवीन कानडी नाटकांचा निर्देश जरूर करावा लागेल. कानडीत साहित्यनिर्मिती क्षेत्रात बरेच काही घडते आहे. चांगले घडते आहे. त्यातला काही भाग या नाटकाच्या रूपाने आला, तसाच पूर्णचंद्र तेजस्वी लिखित 'कर्वालो' कादंबरीच्या रूपाने आला. ही कादंबरी म्हणजे एक उत्कृष्ट वैज्ञानिक कादंबरी. पाश्चात्त्यांच्या तोडीची. ही मराठीत आल्याने मराठी वैज्ञानिक कथा-कादंबरीला बळच मिळाले आहे. म्हणजे एका भाषेतील निर्मिती दुसऱ्या भारतीय भाषेला कसे बळ देऊ शकते याची ही खूण. पंचधारा अर्थातच केवळ एका विभागाशी दृष्टिकोणाशी, बांधील नाही. जुने, नवे, पौर्वात्य, पश्चिमात्त्य, इत्यादी भेद निरर्थक

आहेत. जे मौल्यवान आहे ते आमचे आहे. ते मिळायला हवे. मिळवायला हवे. मग त्यासाठी कितीही मोल पडो, ही आमची धारणा आहे. आज पंचधारेच्या लेखकाच्या रूपाने दक्षिणेतील तेलुगु, कानडी, तमिळ, हिंदी, उर्दू या भाषेतील लेखक कलावंत यांच्याबरोबरच ललित कलांच्या क्षेत्रांत कार्य करणारी अनेक मंडळी सहकार्य करण्यास आनंदाने तयार आहेत, उत्सुक आहेत. त्यांची संख्याही शेकडयाच्या घरात जाईल. हा एवढा मित्र-मेळावा पंचधारेने मराठीसाठी उभा केला. हीदेखील सांस्कृतिक दृष्टीने महत्त्वाची घटना मानायला हवी. त्यांना सतत कामात, कार्यात सहभागी करणे हाच तर आमच्या हालचालीचा प्रधानबिंदू आहे. हे आम्ही हैदराबादेत बसून करू शकतो, आहो याचा आम्हाला रास्त अभिमान वाटतो. व्यावहारिक आर्थिक अडचणी कुणाला नसतात? त्या तर आमच्या पाचवीलाच पूजल्या आहेत. पण आम्ही त्यांना जुमानीत नाही.

पंचधारेच्या आरंभीच्या काही वर्षांत प्रा. भा. शं. कऱ्हाळेकर, डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांचे मार्गदर्शन व सहकार्य मिळाले. प्रा. रा. ब. माढेकर तर मृत्यूपर्यंत हेच करीत होते. मागच्या पिढीतील या मंडळींच्या आशीर्वादानेच पुढे आलेली मंडळी म्हणजे डॉ. नलिनी साधले, प्राचार्य पद्माकर दादेगावकर, प्रा. द. पं. जोशी, श्री. अनिल एकबोटे, दिनकर देशपांडे, अनंत अरगडे ही होत. त्या सर्वांना भक्कम पाठबळ आहे ते पुण्याच्या कल्पना मुद्रणालयाचे, श्री. चिं. स. लाटकर यांचे व परिषदेचे अध्यक्ष श्री. गोपाळरावजी एकबोटे यांचे. त्यातून स्वप्नफुलाची एकेक पाकळी उमलते आहे. पूर्ण फूल अद्याप उमलायचे आहे व आम्हाला तर असंख्य फुलांचा ताटवा हवा आहे.

ग्रंथनिर्मिती, प्रकाशन, पंचधारा याबरोबरच परिषदेने प्रत्यक्ष मराठी समाजाची सतत काळजी घेतली आहे. समाज केवळ संख्येने मोठा असून भागत नाही. तो ज्ञानाभिरूची संपन्न, उत्साही, उदार असावा लागतो. तेथेच संस्कृती, विज्ञान जन्म घेते. या हेतूने परिषदेने गेल्या तीस वर्षांत दोन संमेलने घेतली, चर्चा, परिसंवाद घेतले. अक्षरशः शेकडो सांस्कृतिक कार्यक्रम उभे केले. आल्या गेल्यांच्या गाठीभेटी घेतल्या. व्याख्यानमाला चालू केल्या. व चालू ठेवल्या. पण हे प्रासंगिक झाले. त्याहून खोल प्रश्न म्हणजे मराठीच्या अध्ययन अध्यापनाचा. ती परंपरा तुटली तर सगळेच संपले. म्हणून वेळ न घालविता परिषदेने पंचधारेबरोबरच १९५८ मध्ये मराठी महाविद्यालयाची स्थापना केली. या महाविद्यालयात सहा वर्षांचा भाषा व साहित्याचा मराठी विषयाचा उस्मानिया विद्यापीठाचा अभ्यासक्रम शिकवला जातो. हा अभ्यासक्रम रीतसर बी.ए.चाच अभ्यासक्रम आहे—फक्त मराठीचा व मराठीतून. सायंकालीन वर्ग त्यामुळे सर्वांचीच सोय. मोफत शिक्षण. त्यामुळे समाजावर भार नाही, ताण नाही. विद्यापीठाची मान्यता असल्यामुळे उत्तीर्ण होताच विद्यार्थ्यांना रीतसर पदवी व प्रतिष्ठा; नोकरी मिळण्याची वाट मोकळी. अधिकृत कॉलेज म्हणून राज्य सरकारची मान्यता. म्हणून सगळा खर्च आंध्र प्रदेश सरकारच्या तिजोरीतून होतो. वर्षाला अडीच लाख रुपये नित्यखर्चापोटी मिळतात व उरलेला नैमित्तिक खर्चाचा भार परिषद उचलते. महाविद्यालयासाठी परिषदेने पूर्ण यंत्रणा उभी केली असून पूर्णवेळ प्राचार्य, दहा प्राध्यापक व अन्य सेवकवर्ग मराठी महाविद्यालयातून मराठी भाषा, साहित्य या विषयाचे सहा वर्षे अध्ययन करवून घेतले जाते. व हे विद्यार्थी अन्य महाविद्यालयातून केवळ जुजबी दोन वर्षे दुय्यम भाषा घेणाऱ्या विद्यार्थ्यांपेक्षा अनेक पटीने सरस ठरले आहेत. त्यांना पदव्युत्तर शिक्षण व संशोधन, व्यावसायिक शिक्षण यांची वाट महाविद्यालयाने खुली केली आहे. आतापर्यंत शेकडो विद्यार्थी याचा लाभ घेऊन बाहेर पडले व आजही प्रतिवर्षी ही संख्या १५० एवढी असते.

मराठी महाविद्यालय हा संस्कृती-संवर्धनाच्या प्रक्रियेतील एक मूलभूत व महत्त्वाचा घटक ठरत आहे. केवळ मराठीसाठी मराठीतून अध्ययन अध्यापनाच्या इतक्या सोयी सवलती उपलब्ध असलेली संस्था महाराष्ट्रातही उपलब्ध नाही. त्यासाठी महाराष्ट्राच्या शासनाचे सहकार्य व साह्य मात्र शून्य. परिषदेची प्रत्यक्ष मराठी समाजाची मराठी भाषेद्वारा सेवा करण्याची ही खूण. या सर्व कार्यात व कार्यक्रमांत परिषदेचे अध्यक्ष व आंध्र प्रदेश राज्याचे माजी सरन्यायाधीश श्री. गोपाळरावजी एकबोटे यांचा वाटा फार मोठा आहे. हे कार्य व्हायला हवे, झाले पाहिजे ही त्यांची धारणा आधारभूत नसती तर अनेक कामे बासनात बसली असती. त्यांची इच्छा असूनही परिषदेतून आता त्यांना मुक्त होता येत नाही. एवढे त्यांचे मार्गदर्शन मोलाचे आहे.

वर ज्या तीन-चार ठळक उपक्रमांचा उल्लेख केला त्या व्यतिरिक्त इतरही छोटेमोठे उपक्रम परिषदेचे

आहेतच. परिषदेने कै. भा. शं. कहाळेकर यांच्या स्मरणार्थ संदर्भ ग्रंथालय उभे केले आहे. तसेच बराच मोठा संस्कृत-मराठी हस्तलिखितांचा संग्रह केला आहे. हैदराबादच्या इतिहासाविषयी बरीच सामग्री जमा केली आहे, संशोधित केली आहे, प्रकाशित केली आहे. त्रिभाषिक कोशाचे काम पत्करले आहे. सध्या ते अपूर्ण आहे.

कुणाला हे सगळे गुलाबी व रोचक चित्र वाटेल. भावनेला स्पर्श करणारे म्हणून ते मोहक जरूर आहे. अडचणी, संकटे तर अक्षरशः पदोपदी आहेत. आंध्र सरकारचे काही साह्य जरूर आहे, पण महाराष्ट्र राज्य शासनाला अद्याप आमच्या कार्याची दखल नाही. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पंचधारेसाठी आंशिक अनुदान देते तेवढा मात्र एक अपवाद. अन्यथा सगळे कार्य हे स्थानिक व महाराष्ट्रातील नूज, रसिक व जाणत्या मंडळींच्या निरंतर आश्रयावर. हा आश्रय मोठा ताण वाढविणारा आहे. तो सतत जागृतीचे आवाहन करतो. सतत कार्याची मागणी करतो, विश्रांती, ढिलेपणा नाकारतो. हा ताण अनेक छोट्या मोठ्या व्यक्तींनी वाटून घ्यावा एवढाच आमचा प्रयत्न असतो. तेवढेच आमचे कार्य.

## साभार स्वीकार

### कविता

**अंधाराच्या कविता** : वी. रंगराव; अभिजित प्रकाशन, अमरावती, १९८६; रु. १५ △ **शब्दवेणा** : शंतनू चिंधडे– संपा.; सौ. प्राजक्ता चिंधडे, 'सुरश्री', लकाकी रस्ता, पुणे १६; १९८६; रु. १२ △ **फकिराचे अभंग** : क. मु. शिंदे; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८६; रु. २० △ **शृंगाराची रात साजणा** : स. सो. सुतार; सस्नेह प्रकाशन, जळगाव; १९८४; रु. २० △ **सूरपंजणी** : सुभाष भोपळे; कैलाश पब्लिकेशन्स, औरंगपुरा, औरंगाबाद; १९८६; रु. १५ △ **महेश्वरपंडितांचे श्रीऋद्धिपूरमाहात्म्य** : संपा. ज. शा. देशपांडे– अभिनव प्रकाशन, मुंबई १४; १९८५; रु. १२ △ **गौतमबुद्ध** : ह. रा. इनामदार; सौ. सुशीला कहाळेकर, डोंबिवली; १९८५; रु. ७ △ **वळ** : नीलकांत चव्हाण; कविता प्रकाशन, नाशिक; १९८६; रु. १५ △ **पोरके आभाळ** : मु. वा. कांत; सौ. दीप्ती कांत, मालाड (प.) मुंबई; १९८३; रु. १० △ **मनातली पाखरं** : अशोक काळे; देवका देशमुख, रजधूळ प्रकाशन, अकोला, १९८६; रु. १० △ **खूणगाठी** : ना. घ. देशपांडे; मौज प्रकाशन, मुंबई ४; १९८५; रु. ३६ △ **मालवणी खाजा** : दा. र. दळवी; सुप्रकाश प्रकाशन, कणकवली; १९८६; रु. १० △ **सीमा प्रदेशातील भावगंगा** : डॉ. ताराबाई परांजपे; संपा.; मराठी साहित्य परिषद, हैद्राबाद; आंध्रप्रदेश, १९८५; रु. २० △ **चित्रांगण** : राजा मंगळवेढेकर; सौ. सुमित्रा क्षीरसागर, अतुल प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △ **वाटचाल** : इंदिरा पाटील; इंदिरा पाटील, जळगाव; १९८६; रु. १० △ **जयभारती** : अरविंद पाटोळे; पावा साहित्य मंडळ प्रकाशन, पुणे; १९८६; रु. ६ △ **अनोळख** : शांता शेळके; अजब पुस्तकालय, कोल्हापूर; १९८६; रु. २५ △ **चकवा** : माधवी देसाई; अनिल मेहता, पुणे; १९८६; रु. १० △

**वि. पां. देऊळगावकर**

# कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद

गदग येथील मराठी वाङ्मयप्रेमी मंडळाच्या सुवर्ण महोत्सव प्रसंगी जमलेल्या कर्नाटकस्थ मराठी साहित्य-प्रेमी जनांच्या मेळाव्यात दि. १४ जानेवारी १९७९ रोजी सर्वानुमते 'कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद' या संस्थेची स्थापना झाली. या मेळाव्यात गदग, गुलबर्गा, हुबळी, विजापूर, धारवाड इ. ठिकाणची निमंत्रित मंडळी हजर होती. गदगचे डॉ. चाफेकर बंधू आणि त्यांच्या इतर सहकाऱ्यांनी परिषदेच्या स्थापनेसाठी विशेष पुढाकार घेतला. परिषदेची घटना तयार होऊन त्याचे मुख्य कार्यालय गुलबर्गा येथे ठेवण्यात आले. व संस्थेची नोंदणीही करण्यात आली.

## परिषदेची प्रमुख उद्दिष्टे

१) कर्नाटकाच्या विविध भागांत अस्तित्वात असलेल्या मराठी भाषिक संस्थांना संलग्न करून घेणे व जेथे अशा संस्था नाहीत तेथे त्या निर्माण करण्याचा प्रयत्न करणे व त्यांच्या समस्या सोडविण्यासाठी झटून त्यांच्यात परस्पर सहकार्यासाठी संपर्क निर्माण करणे. २) मराठी भाषा, साहित्य व संस्कृतीची जोपासना करीत असता आंतर भारतीचे उदात्त ध्येय डोळ्यांसमोर ठेवून अन्य भाषिकांशी सौहार्द साधणे. ३) मराठी भाषेच्या वाङ्मयीन, शैक्षणिक, संशोधनात्मक इ. कार्यास प्रोत्साहन देणे.

परिषदेच्या स्थापनेच्यावेळी एक कार्यकारिणी नियुक्त केलेली होती. ती पुढीलप्रमाणे– सर्वश्री अध्यक्ष– प्रा. वि. पां. देऊळगावकर (गुलबर्गा) उपाध्यक्ष– वा. सु. प्रयाग (धारवाड), शं. वा. आपटे (हुबळी) श्रीमती उषाताई आठवले (गदग) कार्यवाह– प्रा. चंद्रशेखरकपाळे (गुलबर्गा), शरद देसाई (धारवाड), डॉ. अरविंद चाफेकर (गदग), सदस्य– अ. ह. पटवर्धन, वा. कृ. तिनईकर (गदग), गो. श्री. सोहनी (हुबळी), न. कृ. जोशी, सौ. वसुधा मोडक (धारवाड) प्रा. श्री. रं. भिडे, त्र्यं. ग. परचुरे (विजापूर) प्रा. वसंत कुलकर्णी (गुलबर्गा)

दि. ३–३–१९८५ रोजी पुढील विद्यमान कार्यकारिणी निवडून आली, अध्यक्ष– प्रा. वि. पां. देऊळगावकर (गुलबर्गा) उपाध्यक्ष– वा. सु. प्रयाग, (धारवाड), गो. श्री. सोहनी (हुबळी), जे. एन. कदम (होळसमुद्र), कार्यवाह– प्रा. चंद्रशेखर कपाळे (गुलबर्गा), शरद देसाई (धारवाड) डॉ. अरविंद चाफेकर (गदग) सदस्य– वा. कृ. तिनईकर, व्ही. एन्. गोडखिंडी (गदग), विद्याधर मुरुगकर (गुलबर्गा) श. अ. गोडसे (हुबळी), त्र्यं. ग. परचुरे (विजापूर) माधवराव कादेपूरकर (बिदर), श्रीमती वसुधा मोडक (धारवाड) दीपक गावकर (कारवार).

कर्नाटक राज्यात सध्या कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषदेस पुढील संस्था संलग्न झाल्या आहेत १) मराठी वाङ्मयप्रेमी मंडळ, गदग, २) महाराष्ट्र मंडळ, हुबळी ३) मराठी साहित्य मंडळ, गुलबर्गा ४) मराठी मंडळ, धारवाड ५) मराठी मंडळ, विजापूर ६) श्रीनाथ म. सा. मंडळ, होळसमुद्र. ७) म. सा मंडळ, बिदर. ८) म. सा. मंडळ, भालकी. ९) म. सा मंडळ, कारवार. या सर्वच संस्थांच्याकडून शैक्षणिक साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रमांच्याद्वारे मराठी मायबोलीची सेवा निष्ठापूर्वक केली जाते.

## क. रा. म. सा. प. चे कार्य

क. रा. म. सा. परिषदेच्या सततच्या प्रयत्नाने व पाठपुराव्याने गुलबर्गा विद्यापीठात नव्यानेच मराठी विभाग उघडला जाऊन कार्यरत झाला आहे. शिवाय याच शिकस्तीने आकाशवाणीच्या धारवाड गुलबर्गा केंद्रावर मराठी कार्यक्रम सुरू झाला. सध्या फक्त दहा मिनिटे ध्वनिमुद्रिकेच्या स्वरूपात मराठी कार्यक्रमाची वेळ वाढवून त्यात विविधता आणण्यासाठी केंद्रीय

नभोवाणी मंत्र्यांशी संपर्क साधणे चालू आहे. कर्नाटकातील मराठी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांची मराठीतून शिक्षणाची सोय व्हावी व मराठी प्रथम भाषा म्हणून शिकण्याची संधी उपलब्ध व्हावी यासाठी व योग्य त्या मराठी शिक्षकांची शासकीय शिक्षण संस्थांतून नेमणूक व्हावी यासाठीही परिषद सतत प्रयत्नशील आहे. कर्नाटकात शिक्षणाव्यतिरिक्त मराठी अभिरुचीच्या वाढीसाठी, नाटके, कवीसंमेलन, कथाकथन, व्याख्याने, साहित्यिक मेळावे आदी कार्यक्रमांचे आयोजनही परिषद करत असते. मराठी भाषा, साहित्य व संस्कृतीच्या संवर्धनाच्या कार्यात परिषदेचे सर्वच पदाधिकारी वेळोवेळी प्रवास करून संपर्क साधतात व त्यांच्या प्रयत्नाने परिषदेची सदस्य नोंदणी सतत सुरू असून आजपावेतो १५ ते २० आजीव सदस्य, हितचिंतक व २५० सामान्य सदस्य आहेत. ही संख्या नित्य वाढते आहे ही बाब सांस्कृतिकदृष्ट्या विशेष समाधानाची वाटते.

मराठी भाषेची केंद्रीय संस्था असलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ या संस्थेने कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषदेस बार्शी येथे भरलेल्या साहित्य संमेलन प्रसंगी समाविष्ट संस्था म्हणून मान्यता दिली.

महाराष्ट्राबाहेर मराठी भाषा व संस्कृतीची जोपासना करणाऱ्या बृहन्महाराष्ट्र मंडळ, नवी दिल्ली या संस्थेच्या कार्यामध्येही परिषद वेळोवेळी आस्थेने सहभागी होते.

## क. रा. म. सा. प. चे मुखपत्र 'मायबोली'

मागील वर्षापासून परिषदेने 'मायबोली' हे त्रैमासिक मुखपत्र सुरू केले. पहिल्या अंकाचे प्रकाशन सुप्रसिद्ध ग्रामीण कथाकार व नांदेड साहित्य संमेलनाध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते झाले. या पत्राचे सर्वत्र स्वागत होत आहे.

आपल्या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी परिषद सतत प्रयत्नशील आहे. या प्रयत्नांत कर्नाटकात ठिकठिकाणी विखुरलेल्या सर्व स्तरांतील मराठी भाषिक बंधु-भगिनींना उत्स्फूर्तपणे सहभागी व्हावे म्हणजे परिषदेच्या कार्यास अधिक गती येईल. त्याप्रमाणेच महाराष्ट्रातील साहित्यसंस्था, साहित्यिक विचारवंत व विशेषत: मराठी साहित्य महामंडळ व महाराष्ट्र शासन यांनी सर्वतोपरी साहाय्य करावे अशी कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद अपेक्षा करते. वास्तविक पाहता महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्राबाहेर असलेल्या मराठी संस्थांना नियमितपणे वार्षिक अनुदान देण्याची पद्धत सुरू केल्यास त्या संस्था अधिक कार्यक्षम होऊन आपले कार्यक्रम सुव्यवस्थित रीतीने पार पाडू शकतील असा विश्वास वाटतो.

## कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद : संलग्न संस्था कार्य

परिषदेच्या काही घटक संस्थांनी सुवर्णमहोत्सव साजरा केलेला आहे. उदा. मराठी वाङ्मयप्रेमी मंडळ, गदग. महाराष्ट्र मंडळ, हुबळी, मराठी मंडळ, धारवाड. त्याच्या पाठोपाठ गुलबर्गा येथील मराठी साहित्य मंडळ या संस्थेने ४२ व्या वर्षात पदार्पण केले आहे. त्यामानाने इतर संलग्न संस्था या आत्ताच कुठे स्थिर होत आहेत. तरीपण कार्यक्रमांच्या दृष्टीने प्रत्येक संस्थेचे एक वैशिष्टय आहे आणि ती संस्था मराठीची विविध प्रकारांनी सेवा करण्याची धडपड करीत आहे. गदग, हुबळी, धारवाड, विजापूर येथील गणेशोत्सव व त्या अनुषंगाने होणारे कार्यक्रम मराठी प्रेमी मंडळींना एक पर्वणीच ठरतात. कारण गणेशोत्सवात आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना आकर्षित करणारे कार्यक्रम आयोजिले जातात. या उत्सवाव्यतिरिक्त विजापूर येथील मंडळाने रंगभूमीकडे विशेष लक्ष पुरविल्याचे दिसते. होळसमुद्र, बिदर, भालकी या भागात गणेशोत्सवाबरोबरच शिवजयंती, बसव जयंती, आंबेडकर जयंती इ. उत्सवही मोठ्या आकर्षक पद्धतीने साजरे केले जातात.

गुलबर्गा येथे वर्षातून टिळक पुण्यतिथी, बहुभाषिक कवीसंमेलन, नाटके, एकांकिका, संगीत, संत काव्यदर्शन, व्याख्याने, परिसंवाद हे कार्यक्रम चाललेले असतात. या बरोबरच गुलबर्गा मराठी साहित्य मंडळाचे आणखी एक वैशिष्टय म्हणजे हे मंडळ 'अनुबंध' नावाचे एक वाङ्मयीन व विशेषत: संशोधनाला वाहिलेले असे त्रैमासिक प्रकाशित करते.

या त्रैमासिकाने आता दहाव्या वर्षात पदार्पण केले आहे. या त्रैमासिकाने आतापर्यंत लोकसाहित्य विशेषांक, दलित साहित्य विशेषांक व कन्नडमधील श्रेष्ठ नाटककार टी. पी. कैलासम विशेषांक असे तीन महत्त्वपूर्ण अंक प्रकाशित केले व या तिन्ही विशेषांकांचे महाराष्ट्रातील विचारवंतांनी यथोचित स्वागत केले. या त्रैमासिकास महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने अनुदान देऊन प्रोत्साहित केले आहे ही बाब विशेष समाधानाची वाटते. या त्रैमासिकाने कर्नाटकातील व बाहेरील अनेक नवोदितांना प्रकाशात आणले.

सध्या परिषदेपुढे नियमितपणे कर्नाटक प्रांतीय मराठी साहित्य संमेलन भरवण्याची योजना आहे. यामुळे संघटना अधिक बळकट होऊन परिषदेचे कार्य गतिमान होईल, ही अपेक्षा आहे.

...५

प्रल्हाद वडेर

# गोमंतक साहित्य सेवक मंडळ, पणजी

मराठी भाषा आणि साहित्य यांचा प्रचार व प्रसार करण्याच्या उद्देशाने इ. स. १९२८ मध्ये गोमंतक साहित्य सेवक मंडळ, पणजी, या संस्थेची स्थापना करण्यात आली. १५ वे महाराष्ट्र साहित्य संमेलन भरविण्यासाठी त्यावेळचे कार्यकर्ते सर्वश्री कै. शांबाराव सरदेसाई, कै, शिवा फटू पै आंगले. कै. न. पु. सुकेरकर व श्री. वा. द. सातोस्कर यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी हा पुढाकार घेतला. त्यांनी या मंडळाला साहित्यिकच नव्हे तर राजकीय ध्येय व व्यासपीठ मिळवून दिले. त्यामुळे मराठी साहित्याचा व भाषेचा प्रचार व प्रसार या मंडळाच्या घटनेतील मार्गदर्शक तत्त्वाबरोबर गोमंतकाची मुक्ती हेही मंडळाचे एक ध्येय ठरले. त्यांचा सतत पुरस्कार व पाठपुरावा मंडळाच्या साहित्य संमेलनातून करण्यात आला. या राजकीय ध्येयवादाचा एक परिणाम म्हणजे मंडळाची गोमंतकाच्या मुक्तिपूर्वीची बहुतेक सर्व संमेलने त्यांच्या पुरस्कर्त्यांना गोव्याबाहेर भरवावी लागली. कारण गोव्यात गोव्याच्या मुक्तीचा ठराव संमेलनाच्या व्यासपीठावरून मांडणे पोर्तुगीज राजवटीत शक्यच नव्हते. गोमंतक साहित्य सेवक मंडळाची पहिली दहा संमेलने इ. स. १९३५ ते १९६० या कालखंडात अनुक्रमे मडगाव, मुंबई (दोनदा), पुणे, बेळगाव, कारवार, मालाड, विलेपार्ले व लोणावळे येथे भरली. या साहित्य संमेलनाचे अध्यक्षही प्रसिद्ध मराठी साहित्यिकच होते. मडगाव येथे इ. स. १९३५ मध्ये भरलेल्या पहिल्या गोमंतकीय मराठी साहित्य समेलनाचे अध्यक्ष कै. भाऊसाहेब खांडेकर होते. तर नंतरची अधिवेशने सर्वश्री तकतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, काका कालेलकर, शंकरराव देव, प्रभाकर पाध्ये, काकासाहेब गाडगीळ, ना. ग. गोरे, न. र. फाटक, म. म. द. वा. पोतदार व अनंत काणेकर यांनी भूषविली. संमेलनांची उद्घाटनेही सर्वश्री न. चि. केळकर, द. का. कुंटे, हरे कृष्ण मेहताव, कॉ. मिरजकर, ग. ल. चंदावरकर अशा नामवंत व्यक्तींनी केली. संमेलनाचे स्वागताध्यक्षात मात्र गोमंतकीय होते. त्यात कै. शांबाराव व यशवंतराव सू, सरदेसाई, द. व्यं. पै, पं. महादेवशास्त्री जोशी, वा. द. सातोस्कर, जनाप्पा कामत, डॉ. व्यं. म. कैंकिणी, वा. भ. बोरकर, सां. घ. कंटक व कॉ. नारायण देसाई या नामवंतांचा समावेश होता.

गोमंतक मुक्त होईतोपर्यंत म्हणजे १९ डिसेंबर १९६१ पर्यंत गो. सा. से. मंडळ आपली साहित्य संमेलने काहीशा अनियमितपणे भरवीत होते. इ. स. १९६२ मध्ये अकरावे साहित्य संमेलन स्वतंत्र गोमंतकात पणजी येथे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली भरले. उद्घाटक होते कै. न. वि. गाडगीळ व स्वागताध्यक्ष होते कै. दा. अ. कारे. त्यानंतर म्हापसा, फोंडा, वास्को, कुडचडे, डिचोली व मंगेशी येथे पुढील संमेलने भरली. त्यांचे अध्यक्ष अनुक्रमे सर्वश्री ग. दि. मा. अनंत काणेकर, व्यंकटेश माडगूळकर, लक्ष्मणराव सरदेसाई, पं. महादेवशास्त्री जोशी व वा. द. सातोस्कर आणि उद्घाटक होते नाथ पै, अप्पासाहेब पवार, वसंत कानेटकर, माधव गडकरी, लक्ष्मीकांत भेंडे आणि गंगाधर गाडगीळ. १९७७ मध्ये कुडचडे येथे भरलेल्या १५ व्या अधिवेशनापासून गोमंतकीय साहित्यिक अध्यक्ष म्हणून निवडण्याची प्रथा सुरू झाली, ती कायम आहे. त्यामुळे गोमंतकीय मराठी साहित्य संमेलन खऱ्या अर्थाने 'गोमंतकीय' झाले.

गोवा मुक्तीनंतर गो. सा. से. मंडळाच्या कामात १९७५ पर्यंत काहीशी मरगळ येऊन खंड पडला होता. पण श्री. माधव गडकरी दैनिक 'गोमंतक'चे संपादक म्हणून गोव्यात आल्यावर त्यांनी मंडळाच्या कार्याला चालना दिली. ते नव्या जोमाने काम करू लागले. या कामात माधवरावांच्याबरोबरच सर्वश्री भाऊ आंगले, दत्ता सराफ, वामन राधाकृष्ण, प्रल्हाद वडेर, रवींद्र घवी, यशवंत कर्णिक, महाराष्ट्र परिचय केंद्राचे प्रभाकर



अनुक्रमणिका

भुसारी, प्रा. मनोहर हिरवा सरदेसाई, प्रा. शशिकांत सरदेसाई, लक्ष्मीनारायण पारज, प्रा. वाघ, डॉ. ग्रामोपाध्ये, नंदकुमार कामत व प्रा. अरुण साखरदांडे इत्यादींचाही मोठा वाटा आहे.

या मंडळाचे अध्यक्षपद आतापर्यंत नामवंत गोमंतकाय साहित्यिकांनी भूपविले आहे. त्यात सर्वश्री वाकीवाव बोरकर, लक्ष्मणराव सरदेसाई, वा. द. सातोस्कर दा. अ. कारे इत्यादींचा समावेश आहे. मंडळाने केवळ द्विवार्षिक साहित्य संमेलने भरविण्यावरच समाधान मानलेले नाही. तर चर्चासत्रे–शिविरे, व्याख्याने, परिसंवाद, व्याख्यानमाला, पुस्तक प्रकाशने यांवरही भर दिला. मराठीतील अनेक नामवंतांना निमंत्रणे देऊन गोमंतकीय रसिकांना त्यांच्या भाषणांचा लाभ मंडळाने दिला आहे. मंडळाने दरवर्षी कै. अ. का. प्रियोळकर व इतिहासतज्ज्ञ कै. पांडुरंग पिसुर्लेकर यांच्या स्मरणार्थ दोन व्याख्यानमाला सुरू केल्या. त्यात सर्वश्री पगडी, व. दि. कुलकर्णी व म. वा. धोंड यांची आतापर्यंत भाषणे झाली आहेत.

व्याख्यानांच्या बरोबरच नवोदित कथाकारांना व कवींना मार्गदर्शन म्हणून मंडळाने कला अकादमीच्या सहकार्याने कथा-कविता शिविरे आयोजित केली व त्यात सर्वश्री वा. ल. कुलकर्णी, पुंडलिक व बापट यांनी मार्गदर्शन केलं.

मंडळाने आतापर्यंत कला अकादमी (गोवा)च्या सहकार्याने चार पुस्तके प्रकाशित केली आहेत.

गोव्यातील सुरुवातीच्या मराठी नाटयस्पर्धाही साहित्य सेवक मंडळाच्या नाटयशाखेने आयोजित केल्या होत्या हे येथे मुद्दाम नमूद केरावेसे वाटते. आता त्या कला अकादमीतर्फे घेतल्या जातात.

मंडळातर्फे प्रसिद्ध गोमंतकीय व मराठी साहित्यिकांचे जन्मदिन व स्मृतीदिन साजरे होतात. तसेच इतरही अन्य कार्यक्रम म्हणजे चर्चा व्याख्याने, कविसंमेलनेही भरविली जातात. गोवा शासनाने मंडळाला मिनेझिस ब्रॅगन्झा इमारतीत अल्प भाड्याने जागा दिली आहे व त्यांच्या सभागृहाचा लाभ अन्य सांस्कृतिक संस्था सतत घेत असतात.

इ. स. १९७८ मध्ये मंडळाला ५० वर्षे पूर्ण झाली व त्याचा सुवर्णमहोत्सव पणजी येथे श्री. गंगाधर गाडगीळांच्या अध्यक्षतेखाली मोठा थाटात साजरा झाला.

मंडळाला आता मराठी साहित्य महामंडळावर समाविष्ट संस्था म्हणून कायमचे स्थान मिळाले आहे. अर्थात मंडळाच्या तत्कालीन पदाधिकाऱ्यांना त्यासाठी बराच संघर्ष करावा लागला. पण गोमंतकातील एक सर्वात जुनी व प्रातिनिधिक संस्था म्हणून तिला हे स्थान मिळाले याचा आनंद वाटतो.

मंडळाला हे स्थान मिळण्यात गोमंतकाचे सध्याचे संपादक नारायण आठवले यांचा मोठा वाटा आहे.

गोमंतकातील कोकणी–मराठी वादाची धूळ आपल्या साहित्यविषयक कार्यावर शक्यतो बसू न देण्याचा मंडळाने आतापर्यंत प्रयत्न केला आहे. त्यामुळे गोव्यातील मराठी साहित्यिकांबरोबरच कोकणी साहित्यिकही मंडळाचे सभासद आहेत. मंडळाने मराठीबरोबरच कोकणी साहित्यिकांचाही आपल्या व्यासपीठावरून जाहीर सत्कार केला आहे व त्यांना आपल्या कविसंमेलनात आवर्जून स्थान दिले आहे. मंडळाने आपल्या बाजूने मंडळाचे व्यासपीठ साहित्यविषयक कार्य करण्यासाठीच उपलब्ध असावे असा सातत्याने व यशस्वीपणे प्रयत्न केला आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळातर्फे प्रकाशित होणाऱ्या मराठी वाङ्मयकोशाचे काम गो. सा. सेवक मंडळाने स्वीकारले असून इ. स. १९४७ ते १९८० या कालखंडातील ग्रंथनोंदी तयार करून घेण्याचे काम डॉ. प्रल्हाद वडेर यांच्या संपादनाखाली सुरू आहे.

नुकतेच मंडळाला गोव्याचे माननीय नायब राज्यपाल डॉ. गोपाल सिंग यांनी रु. ५०००/– चे अनुदानही दिले आहे.

इतर साहित्य संस्थांना असतात तशा अडचणी साहित्य सेवक मंडळापुढेही आहेत. कार्यकर्त्यांचा व शासकीय अनुदानाचा अभाव, टी. व्हीच्या आक्रमणामुळे व्याख्याने-चर्चा यांचे कमी झालेले आकर्षण, इंग्रजी माध्यमाच्या लाटेने मराठीपासून दुरावत चाललेली तरुण पिढी वगैरे समस्या येथेही भेडसावतात. मंडळाला अद्याप स्वतःच्या मालकीची वास्तू नाही. पण या अडचणी दूर होऊन मंडळाची अपुरी स्वप्ने पुरी होतील असा विश्वास वाटतो.

## महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दर वर्षी दिली जाणारी ग्रंथ पारितोषिके

| | |
|---|---|
| कादंबरी– ह. ना. आपटे स्मृत्यर्थ | १००–०० |
| कविता– ह. स. गोखले स्मृत्यर्थ | ३००–०० |
| समीक्षा– ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक | ५००–०० |
| कुमार वाङ्मय– सुशील प्रधान स्मृत्यर्थ | २००–०० |
| संपादित ग्रंथ– गिरिजा– गंगाधर जांभेकर स्मृत्यर्थ | १००–०० |
| उत्कृष्ट प्रकाशन– अ. स. गोखले स्मृत्यर्थ | ३००–०० |
| कथासंग्रह– नी. स. गोखले स्मृत्यर्थ | ३००–०० |
| संतवाङ्मय विषयक ग्रंथ– तुळशीराम वाघ स्मृत्यर्थ | २५०–०० |
| ललितेतर वैचारिक– ना. गो. चापेकर स्मृत्यर्थ | २५०–०० |
| ललितेतर वैचारिक– शि. म. परांजपे स्मृत्यर्थ | २५०–०० |
| ललितेतर वैचारिक– विश्वनाथ-पार्वती गोखले स्मृत्यर्थ | १५०–०० |
| ललितेतर वैचारिक– गणेश-सरस्वती ठाकूरदेसाई स्मृत्यर्थ | ५००–०० |
| ललितेतर वैचारिक– गणेश-सरस्वती ठाकूरदेसाई स्मृत्यर्थ | ४००–०० |
| वैचारिक संशोधनपर– श्री. शां. हणमंते स्मृत्यर्थ | ३५०–०० |
| कादंबरी– वा. म. जोशी स्मृत्यर्थ | १०००–०० |
| विनोद– चिं. वि. जोशी स्मृत्यर्थ काँटिनेंटल प्रकाशन | १२००–०० |
| कविता– कुसुमाग्रज पारितोषिक काँटिनेंटल प्रकाशन | १२००–०० |
| (वरील दोन्ही पुस्तकांच्या प्रकाशकांनाही प्रत्येकी ९०० रु.) | १८००–०० |
| कथा– ग. रा. वाळ ट्रस्ट पारितोषिक (वर्षभरातील उत्कृष्ट कथेस) | १०००–०० |

याशिवाय साहित्यक्षेत्रात भरीव कार्य करणाऱ्या व्यक्तीस महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दर वर्षी रु. २००० चे खास पारितोषिक व मानचिन्ह परिषदेच्या वर्धापन-दिनी (२७ मे) देण्यात येते. तसेच दर वर्षी तीन उत्कृष्ट दिवाळी अंकांना प्रत्येकी १०० रु. ची पारितोषिके दिली जातात. दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखास अनंत काणेकर यांचे स्मृत्यर्थ २०० रु चे एक पारितोषिक दिले जाते.

एकूण दर वर्षी रु. १२,६५० रकमेची पारितोषिके दिली जातात. लेखकांनी वा प्रकाशकांनी पारितोषिकांसाठी १९८६ मध्ये प्रकाशित झालेल्या पुस्तकांच्या दोन प्रती ५ जानेवारी १९८७ पर्यंत कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३० या पत्त्यावर पाठवाव्या.

# प्रश्नावली

## भूमिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ८० व्या वर्धापन दिनाच्या निमित्ताने महाराष्ट्रातील व महाराष्ट्रावाहेरील साहित्यसंस्था, त्यांचे स्वरूप, त्यांचे परस्परसंबंध अशा अनेक विषयांसंबंधी पुन्हा काही विचार व्हावा अशा कल्पनेने आम्ही एक प्रश्नावली तयार करून ती वेगवेगळ्या क्षेत्रातील काही मान्यवर व्यक्तींकडे पाठविली होती. त्यापैकी काही व्यक्तींनी तत्परतेने उत्तरे पाठविली– काहींनी आपली असमर्थता व्यक्त केली तर काहींना प्रश्नावलीतील प्रश्न फार व्यापक स्वरूपाचे वाटल्याने चर्चासत्र घेऊन या प्रश्नांची चर्चा करावी असेही सुचविले. आम्ही खाली प्रश्नावली देत आहोत आणि त्यानंतर ज्यांनी ज्यांनी तिला प्रतिसाद दिला त्यांची उत्तरे प्रकाशित करत आहोत.

या प्रश्नावलीतील प्रश्नांच्या अनुषंगाने वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया कळविल्यास त्यांचे स्वागत केले जाईल.

—संपादक

१) आजच्या साहित्यसंस्थांत आलेला साचेबंदपणा कसा बदलता येईल? (व्याख्याने, परिसंवाद, मासिके, संमेलने, कार्यक्रमातील तोचतोचपणा)

२) स्थानिक साहित्यरसिकांशी निकटचे संबंध आणण्यासाठी काय करता येईल ?

३) वाङ्मयीन कार्यकर्त्यांचा गट तयार करता येईल काय ? कसा ?

४) नवोदितांना वाङ्मयीनदृष्ट्या आणि संस्थेच्या दृष्टीने कशाप्रकारे कार्यतत्पर करता येईल ?

५) भाषा आणि साहित्य यांच्या वाङ्मयीन क्षेत्रात नाट्य, संगीत, नृत्य, शिल्प इ. कलांवर कितपत भर द्यावा ?

६) साहित्याच्या अभ्यासास पूरक कार्य परिषदेस करता येईल काय ? (अभ्यासशिबिरे, लेखनसंस्कार, अभिरुचीसंस्कार इ.)

७) साहित्यसंस्थांच्या नियतकालिकांचे स्वरूप काय असावे ? (संशोधनात्मक । समीक्षात्मक । ललित)

८) साहित्यसंस्थांच्या कार्याचे संयोजन (Co-ordination) होत आहे का ? (व्याख्याने, परिसंवाद, नियतकालिके इ.)

९) विविध विषयांचा समान विचार कसा करता येईल ? (उदा. साहित्य आणि समाजशास्त्र । राज्यशास्त्र । मानसशास्त्र इ.)

१०) विविध क्षेत्रात मराठी कार्यक्षम करण्यासाठी काय करता येईल ? कार्यवाही कशी करता येईल ?

११) मराठी साहित्य महामंडळाचे स्वरूप प्रभावी करण्यासाठी काय करता येईल ?

१२) साहित्यिक आणि राज्यकर्ते यांचे संबंध कसे असावेत ?

१३) साहित्यसंमेलनाध्यक्ष निवडण्याची सध्याची पद्धती आपणास मान्य आहे काय ? आपण कोणती योजना सुचवाल ?

१४) साहित्यसंमेलनात रसिकांची प्रचंड उपस्थिती असली तरी साहित्यिक मात्र उदासीन असतात, ही स्थिती बदलता येईल काय ?

१५) स्थानिक । जिल्हा । विभागीय साहित्यसंमेलनात एकसूत्रीपणा कसा आणता येईल ?

१६) मराठी व अन्यभाषिक प्रांतातील साहित्य यात आदानप्रदानाच्या दृष्टीने काय करता येईल ?

## प्रा. वामन चोरघडे

१) साहित्यसंस्यात साचेबंदपणा बदलावा असे मला वाटत नाही. उलट तो पक्का व्हावा असे वाटते. साहित्यसंस्थेत अमुक-अमुक दिवशी अमुक-अमुक वेळी अमुक कार्यक्रम निश्चित आहे याची श्रोत्यांना खात्री असायला हवी. श्रोते अधिक जमले म्हणजे कार्यक्रम यशस्वी झाला, हा विचार संस्थेच्या कार्यपद्धतीला मारक आहे. कार्यक्रमात तोचतोचपणा येतो, त्याचे मुख्य कारण ते मनापासून योजले जात नाहीत हेच आहे.

२) साहित्य रसिकांशी निकटचे संबंध कार्यक्रमपूर्वक प्रस्थापित करता येतील हे खोटे आहे. रस असला की रसिक आपोआपच येतात.

३) गट तयार करणे, मग तो कोणत्याही क्षेत्रातील कार्यकर्त्यांचा असो, लोकशाहीला शोभेसा नसतो. गटागटाने तत्परता येतेच असे नाही.

५) भाषा आणि साहित्याच्या क्षेत्रात नाट्यसंगीत, नृत्यशिल्प अंतर्भूतच समजावे. फक्त भाषा आणि साहित्य यांच्या उन्नतीचीच मर्यादा तेवढी संभाळावी.

६) साहित्याच्या अभ्यासाला लेखनशिबिरे, वाचनशिबिरे हा प्रयोग करून पहाण्यासारखा आहे. फक्त संस्कारकर्ते सुसंस्कृत असावेत. साहित्य संस्कृती मंडळाने भरविलेल्या शिबिरांसारखा बट्टयाबोळ करू नये !

७) साहित्य संस्थांच्या नियतकालिकाचे स्वरूप सध्या तरी संशोधनात्मकच असावे, संशोधन म्हणजे काय हे अगोदर नियतकालिकाने स्पष्ट करावे. ललित साहित्याला इतरत्र प्रसिद्धी मिळते म्हणून संशोधनात्मक साहित्यावरच जोर असावा.

९) साहित्यशास्त्रामध्ये सर्वच शास्त्रे येतात. समान विचाराचा प्रश्न उद्‌भवत नाही.

१०) विविध क्षेत्रात मराठी कार्यक्षम करण्यासाठी जी पोटतिडीक हवी असते, ती महाराष्ट्रातील कुठल्याही साहित्य संस्थेत नाही, हे स्पष्टपणे नमूद करू इच्छितो. एकूण परिस्थिती भयानक आहे. मराठी साहित्याला वाचकच उरणार नाही, अशी परिस्थिती दिवसेंदिवस वाढत आहे.

११) मराठी साहित्य महामंडळाचे स्वरूप प्रभावी करण्यासाठी मुद्दाम कोणाला काही करता येईल अशी परिस्थिती नाही. आणि मंडळ बरखास्त करणेही शक्य नाही.

१२) साहित्यिक आणि राज्यकर्ते यांच्यात काहीतरी हाडवैर आहे, अशा रोखाने हा प्रश्न विचारण्यात आला आहे.

साहित्य आणि राज्यकर्ते यात साहित्य मोठे आणि राज्यकर्त्यांनी याला मान्यता दिली तर पुरे ! संमेलनाला राज्यकर्त्यांना बोलावू नये, त्यांनी येऊ नये, पण संमेलनासाठी देणगी मात्र द्यावी हा प्रकार हास्यास्पदच मानायचा.

१३) संमेलनाध्यक्ष निवडण्याची सध्याची पद्धत मला पसंत आहे. किंबहुना भोपाळच्या मराठी साहित्य संमेलनात मतदारसंघ अस्तित्वात यावा म्हणून जे प्रयत्न झाले, त्यात मी होतो. मतदार संघ अस्तित्वात येण्यापूर्वी परिस्थिती अशी होती की पुण्या-मुंबईकडील कुणीतरी कुणाचेही नाव सुचवावे आणि अध्यक्षपदाची माळ त्या व्यक्तीच्या गळयात पडावी. पूर्वी मराठी साहित्य संमेलन कुणी बोलावीत नव्हते. दोन वर्षे संमेलनाअभावी गेली. म्हणून वर्धेला पदराला खार लावून संमेलन भरविले गेले आणि अध्यक्षपदाची माळ ज्यांच्या गळयात पडली त्यांची वर्धावासियांना माहितीच नव्हती; व संमेलनाचा खर्च भरून काढण्यासाठी वर्षभर सव्यापसव्य करावे लागले. मतदार संघावर माझा इतका विश्वास आहे की अविरोध निवडून आणण्याच्या पद्धतीला शह मिळावा म्हणून श्री. दुर्गाबाई भागवत यांच्या विरोधात मी उभा राहिलो होतो आणि माझी हार झाल्याने मला मुळीच वाईट वाटले नाही.

१४) या प्रश्नाचे उत्तर महामंडळाच्या बैठकीतच सापडेल. तिथेच हा प्रश्न उपस्थित करणे बरे पडेल.

१६) मराठी आणि अन्य भाषातील साहित्याचे आदान प्रदान हा विचाराचा प्रश्न नाही. सहभावनेचा प्रश्न आहे. परकीय साहित्य चोरून खुशाल मराठीत मोठे व्हायचे, ही चाल गेली २५–३० वर्षे पडली आहे. त्यामुळे आदानचा प्रश्नच उपस्थित होत नाही. प्रश्न प्रदानाचा आहे. आणि ते साहित्यिकाच्या कुवतीवर अवलंबून आहे.

## प्रा. गंगाधर गाडगीळ

१) साहित्य संस्थांच्या कार्यक्रमात काही प्रमाणात तोचतोचपणा येणे अपरिहार्य आहे. तेव्हा या बाबतची टीका काही केले तरी होत राहणारच.

मात्र या कार्यक्रमात सतत काही प्रमाणात नाविन्य आणण्याचा प्रयत्न करीत राहणे आवश्यक आहे.

यासाठी पुढील गोष्टी करता येतील. साहित्यिकांच्या मुलाखती, नव्या अगर जुन्या पुस्तकांवर गप्पागोष्टींच्या स्वरूपात चर्चा, कथाकथन व काव्यवाचन हे लोकप्रिय झालेले कार्यक्रम तिकिटे लावून करणे, साहित्यविषयक प्रदर्शने भरविणे इत्यादी.

नव्या प्रकारचे कार्यक्रम करता येतील. मनोरंजन व साहित्याचे रसग्रहण एकाच कार्यक्रमात होतील अशी व्यवस्था करायला हवी.

वादग्रस्त विषयांवर चर्चा, परिसंवाद, गप्पागोष्टी, अभिरूप खटले असे कार्यक्रम ठेवता येतील.

वाद आणि मनोरंजन या दोन गोष्टी लोकांना आकर्षित करतात हे लक्षात ठेवायला हवे.

नव्याने प्रकाशित होणाऱ्या पुस्तकांवर परिसंवाद घडवून आणण्यासाठी प्रकाशकांचे सहाय्य मिळू शकेल.

२) गावातील साहित्यिकांचे आणि रसिकांचे, गप्पा-गोष्टींचे आणि भोजनाचे (सहलींचेही) कार्यक्रम दर तीन महिन्यांनी एकदा आखता येतील. त्यात एखाद्या विषयावर अगर पुस्तकांवर अनौपचारिक चर्चा घडवून आणावी अगर अनोख्या अनुभवांचे कथन करण्यास सांगावे.

३) लेखकांचे निरनिराळे गट सामान्यपणे असतात. अशा गटांना एक एक कार्यक्रम आखण्यास आवाहन करणे व त्यातील चांगल्या कार्यक्रमास पुरस्कार देणे. यामुळे साहित्यिक काही प्रमाणात कार्यकर्ते होतील.

४) नव्या लेखकांचेही गप्पागोष्टींचे व भोजनाचे अगर सहलींचे कार्यक्रम आखावे. त्यात दोन अगर तीन नव्या पुस्तकांवर चर्चा घडवून आणाव्या.

गावातील सर्व कॉलेजातील साहित्यप्रेमी मुलामुलींचे मेळावे भरवावे.

५) नाटय, संगीत, नृत्य, शिल्प इत्यादी कलांसाठी स्वतंत्र संस्था आहेत. परंतु या क्षेत्रातील कलावंतांच्या कलेचे दर्शन साहित्यिकांना घडावे व त्यावर चर्चा व्हावी अशा योजना आखता येतील.

६) मराठीतील उत्तम पुस्तकांचे रसग्रहण ज्यांच्या अंगी रसिकता व वक्तृत्व आहे, अशा वक्त्यांकडून ज्यात होईल असा एक अनौपचारिक अभ्यासक्रम रसिकांसाठी आखता येईल. त्यासाठी फी ठेवता येईल.

७) साहित्यसंस्थांच्या नियतकालिकात ५० टक्के किंवा ६० टक्के मजकूर ललित स्वरूपाचा असावा. २५ ते ३० टक्के समीक्षात्मक असावा व १० ते १५ टक्के साहित्यिक व साहित्यविश्व याविषयी मनोरंजकपणे माहिती देणारा असावा. भाषा व संशोधन यांना वाहिलेली एक स्वतंत्र संशोधन पत्रिका साहित्य संस्थांनी काढावी.

८) साहित्यसंस्था चालविणारा एक व्यावसायिक वर्ग (Professional cadre) निर्माण होणे आवश्यक आहे. मनोरंजक कार्यक्रम करून संस्थांसाठी व त्यांच्या पगारा-साठी लागणारा पैसाही त्यांनीच उभा करायला हवा. अमेरिकन विद्यापीठे अशा व्यावसायिकांचा उपयोग करतात.

९) साहित्य आणि समाजशास्त्र यांचा समान विचार करण्यात फार धोके आहेत. हा प्रदेश साहित्यसंस्थांनी टाळावा, इतर कामे बरीच आहेत.

१०) विविध विषयांवर मराठीत लेखन व विचार विनिमय व्हावा म्हणून विज्ञान परिषद, अर्थशास्त्र परिषद, इत्यादी संस्था अस्तित्वात आहेत. मराठीच्या उपयोगाला उत्तेजन देण्याचे सर्वसामान्य कार्य साहित्य-संस्थांनी द्यावे. निरनिराळ्या विषयावरचे चांगले ग्रंथ लिहिणाऱ्यांचे सत्कार, स्थानिक अगर अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलनात करावे.

११) साहित्य महामंडळाचे कार्य साहित्यसंमेलन भर-विण्यापुरतेच मर्यादित ठेवावे. इतर कार्य प्रादेशिक व स्थानिक संस्थांनी करावे.

१२) साहित्यिक व राज्यकर्ते यांचे संबंध कसे असावे यावर मी माझ्या साहित्य संमेलनातील अध्यक्षीय भाषणात विस्तृत विवरण केले आहे.

१३) साहित्य संमेलनाचा अध्यक्ष निवडण्याची सध्याची पद्धत काही निर्दोष नाही. पण तिच्याहून दुसरी चांगली पद्धत मला तरी सुचलेली नाही. सध्या-चीच पद्धत एकंदरीत कमी दोषपूर्ण आहे.

१४) साहित्य संमेलनात सर्व साहित्यिकांनी उत्साहाने भाग घ्यावा अशी व्यवस्था करणे अगर योजना आखणे फार कठीण आहे. आज ५० ते ७५ कमीअधिक मान्यता पावलेले साहित्यिक संमेलनात उपस्थित असतात. ही उपस्थिती काही वाईट नाही.

१५) निरनिराळ्या साहित्य संमेलनात एकसूत्रीपणा आणण्याची गरज काय ? त्यासाठी खूप खटाटोप करावा

लागेल, उगीचच वाद होतील आणि हाती फारसे लागणार नाही.

१६) हे काम साहित्य अकादमीचे आहे. तिच्याकडे साहित्य संस्थांनी काही योजना पाठवाव्या. साहित्य संस्थेचे प्रतिनिधी सामान्यत: अकादमीच्या सल्लागार मंडळात असतात. याबाबतीत सर्वांनी एकत्र बसून चर्चा करता येईल.

प्रश्नपत्रिका फार मोठी आहे, म्हणून प्रश्नांची उत्तरे मी सूत्ररूपाने दिली आहेत. त्यांचे विवरण केलेले नाही.

## छाया दातार

सार्वजनिक क्षेत्रात काम करताना लक्षात येतेय की साहित्यातून जीवनदृष्टी मिळत असते. आणि लोक ती समजून घ्यायला उत्सुक असतात. स्त्रियांच्या आत्मचरित्रांतून दिसणारे स्त्रीमन, जाणीवा, मूल्य व्यवस्था, तसेच पुरुषांच्या आत्मचरित्रातून दिसणारे स्त्री-चित्रण अशा पद्धतीच्या विषयांमध्ये बराच रस दाखविला जातो. याचा अर्थ साहित्य कसे बघावे, कसे जीवन समृद्ध करण्यास वापरावे हे लोकांना शिकविण्यासारखे कार्यक्रम सातत्याने होणे आवश्यकच आहे. व्याख्याने, परिसंवाद यापेक्षा मुलाखतीसारखे कार्यक्रम अधिक आकर्षक होतात असेही लक्षात आले आहे. तसेच लेखकशिबिरे, नव लेखकांच्या लेखनाची समीक्षा असे कार्यक्रम ठेवूनही लेखनाला दिशा देणे शक्य होते असे वाटते. सामुहिक लेखन, लेखकांचे गट वगैरे करून स्तंभ लेखन, ललित लेख वगैरे लेखन शक्य होते. त्याचा उपयोग अभ्यास करण्यासाठीही होऊ शकतो. समीक्षात्मक लेखनही कसदार कसे होऊ शकेल तेही शिकविणे आवश्यक आहे. लेखन हा सर्जनशील व्यवहार आहे. आणि तो एकेकटयाने करावा हे मानणे चुकीचे ठरेल. म्हणूनच साहित्य परिषदांसारख्या संस्थांनी केवळ संमेलने वगैरे सारखे उत्सवी कार्यक्रम न घेता शिबीरासारख्या कार्यक्रमांवर भर देऊन कार्यकर्ते तयार करणे व गावोगावी साहित्य अभिरूची वाढविण्याचे प्रयत्न करणे हे प्रथम कर्तव्य समजावे असे वाटते.

## प्रा. प्र. ना. परांजपे

चित्रवाणी, व्हिडीओ, दैनिकांच्या रविवार आवृत्या इत्यादींमुळे लोकांची मुळातच कमकुवत असलेली सांस्कृतिक भूक भागविली जाते. विशेषत चित्रवाणी वरील मालिका व व्हिडिओ यांच्या नाविन्यामुळे, शिवाय शिक्षणाच्या प्रसारामुळे साहित्यविषयक उत्साहाचे केंद्र पुण्यामुंबई बाहेर सरकले आहे याचीही दखल घ्यायला हवी. आणि रंगीतपणामुळे प्रत्यक्ष जीवनातील समस्यांबद्दल उदासीनता व passivity वाढत आहे.परंपराप्रधान समाजाकडून Mass Society कडे ही वाटचाल आहे, ही आजच्या साहित्य-व्यवहारातील मूलभूत परिस्थिती आहे हे आपल्याला विसरून चालणार नाही. म्हणून १०।२० वर्षापूर्वीपर्यंत लागू पडणारे उपाय यापुढे प्रभावी ठरणार नाहीत. त्यामुळे लोक जमण्यातील अडचणी, तिथे ते जमतात तिथे ते का जमतात यांचा अभ्यास, लोकांच्या सहभागाची सोय कार्यक्रमातच अंतर्भूत करणे, साहित्यिक कार्यक्रमाला सामाजिक घटनेचे (event) किंवा समारंभाचे स्वरूप देणे, अनौपचारिकतेवर भर देणे आणि एकूण साहित्य-व्यवहार वाढण्यावरच साहित्यसंस्थांचे यश अवलंबून आहे याचे भान राखणे हे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे सर्व पातळयावरील भाषांचे अध्यापन व त्यासाठी लागणारी सामग्री सिद्ध करणे, साहित्य व भाषाविषयक संशोधन, ग्रंथ व नियतकालिक प्रकाशन, व्याख्याने, परिसंवाद, चर्चा, प्रदर्शने, लेखक भेटीचे कार्यक्रम, जाहीर मुलाखती, Quiz सारखे कार्यक्रम अशा सुनियोजित विविधतापूर्ण उपक्रमांची गर्दी उडवून दिली पाहिजे आणि जेथे जेथे असे उपक्रम होत असतील तेथे तेथे सहभागी झाले पाहिजे. 'ग्रंथाली' प्रमाणे साहित्य परिषदेनेही सबंध दिवसाचे मेळावे घ्यायला काय हरकत आहे ? दर पंधरा दिवसांनी दर आठवडयाला भेटणारे व एखाद्या विशिष्ट पुस्तकाचे वाचन-चर्चा करणारे मंडळ का सुरू नये ? अशा मंडळात चार माणसे जरी आली तरी तो उपक्रम यशस्वी आहे असे मानावे लागेल. कारण आजकाल पुस्तकांबद्दल Casual Remarks पेक्षा गंभीरपणाने बोलताना दोन मित्रसुद्धा आढळणे मुष्कील झाले आहे.

काही प्रश्नांची उत्तरे वरील विवेचनात येऊन गेली आहेत. उरलेल्या प्रश्नांना उत्तरे देण्याचा आता प्रयत्न करतो. (लोकसत्तेच्या १०–१–८६ च्या अंकातील 'चौफेर'मधील 'मुंबई मराठी साहित्य संघा'वरील टीकेचे साहित्य परिषदेच्या प्रत्येक पदाधिकाऱ्याने मनन करावे अशीही सूचना करावीशी वाटते.)

१, २, ३, ६. चर्चामंडळ, पुण्यावाहेरील साहित्यिकांना पुण्यात बोलाविणे व पुण्यातील साहित्यिकांना पुण्यावाहेर

नेणे, सबंध दिवसाचे (चहा-जेवणासहित) व २-३ आकर्षक कार्यक्रम देणारे मेळावे आयोजित करणे, साहित्य परिषदेतर्फे पुण्याच्या विविध भागात स्थानीय संस्थांच्या (शाळा, महाविद्यालये, तरुण मंडळे, हमाल पंचायत, गणपती मंडळे इ.) सहकार्याने कार्यक्रम आयोजित करणे, जवळपासच्या गावांतून ग्रंथदिंडी, ग्रंथयात्रा इ. उपक्रम करणे– मुख्य म्हणजे परिषदेच्या इमारतीबाहेर पडून लोकांच्यापर्यंत पोचण्याचा प्रयत्न करणे. या उपक्रमांतून आपोआपच तरुण कार्यकर्ते मिळतील.

४) साहित्यातील तंत्राचे विश्लेषण करणारी कार्यक्षेत्रे आयोजित करणे– नवोदितांच्या साहित्यकृतींवर परखड चर्चा करणे, समीक्षा छापणे, प्रकाशित झालेल्या समीक्षेची चर्चा करणे. नाटककारांसाठी शिबिरे होतात त्याचप्रमाणे विशेष योजना आखून व सुजाण कार्यक्षम अशा व्यक्तींच्या साहाय्याने नवोदितांसाठी शिबिरे घ्यावीत.

५) साहित्येतर कलांवर बहिष्कार घालू नये, पण त्यांच्यात फार अडकूही नये १५ ते २० टक्केच त्यांना (साहित्याच्या तुलनेत) महत्त्व द्यावे. त्या कलांच्या साहित्याशी असलेल्या संबंधावर व अनुबंधावरच भर द्यावा.

७) प्रामुख्याने संशोधनात्मक व समीक्षात्मक.ते करून निधी उरल्यास ललित.

८) नाही.

९) आवश्यक. मुख्यतः साहित्यकृतींच्या चर्चेतून.

१०) मराठी अभ्यास परिषदेला पाठिंबा व सहकार्य देऊन.

११) गरज नाही.

१२) परस्पर विश्वासाचे, आदराचे व समजुतीचे

१३) साहित्यिकांना उमेदवारी अर्ज भरायला लागू नये. साहित्यसंस्थांच्या सभासदांनी नावे सुचवावीत. त्यात भरघोस मते मिळविणाऱ्या चार-पाच साहित्यिकांमधून दुसऱ्या स्तरावर सध्याच्या पद्धतीने निवड करावी. Filmfare प्रमाणे Populist a Elilist पद्धतींचा समन्वय साधावा.

१४) कार्यक्रमात सहभाग असो वा नसो– दीडशे प्रमुख साहित्यिकांना किमान द्वितीय श्रेणी भाडेखर्च द्यावा. राहण्या जेवण्याची विनामूल्य सोय करावी. त्यांची ओळख करून देण्याचा कार्यक्रम ठेवावा.

१६) भाषांतरांना उत्तेजन देणे. भाषांतरांना वाहिलेले नियतकालिक चालविणे.

## श्री. रामदास भटकळ

१) साहित्यसंस्थांचे काही कार्य सातत्याने असायलाच हवे. उदा. व्याख्याने, परिसंवाद, मासिके, संमेलने हवीतच. फक्त ही योजनाबद्ध नावीन्यपूर्ण करण्यात यावीत. शिवाय या पलीकडे काय करता येईल याचा विचार होऊ शकेल.

५) साहित्याचा जीवनाच्या विविध अंगांशी संबंध हा आहेच. इतर कलांशी तर आहेच. तेव्हा ह्या सर्वांचा विचार आवश्यक. परंतु निव्वळ इतर कलांवर भर देऊन साहित्याकडे दुर्लक्ष होऊ देऊ नये. स्थानिक सभासदांना ज्या कलांमध्ये विशेष रस आहे त्या कलांवर भर देणे सयुक्तिक ठरेल.

७) सर्व साहित्यसंस्थांच्या नियतकालिकांचे स्वरूप एकाच तऱ्हेचे असण्याची आवश्यकता नाही. 'युगवाणी', 'प्रतिष्ठान' यांनी प्रादेशिक लेखक-समीक्षकांचे संवर्धन करावे. म. सा. पत्रिकेने आणि मुंबई मराठी साहित्य-संघाने नियतकालिक सुरू केल्यास त्याने समीक्षा-संशोधन हे विषय वाटून द्यावेत. थोडक्यात प्रत्येक नियतकालिकाला आपले असे खास स्वरूप असावे आणि इतर मासिकांतून वेगळे असावे.

१२) साहित्यिक आणि राज्यकर्ते यांचे संबंध कसे असावेत यासंबंधीची दुर्गा भागवत यांची भूमिका मला बव्हंशी मान्य आहे. शासनाची जी अनेक कर्तव्ये आहेत त्यात साहित्याला उत्तेजन देणे हेही आहे. परंतु यात कोणीही कोणावर मेहेरबानी करत नाही हे स्पष्ट असावे. त्याचप्रमाणे राजकारणी व्यक्तीला किंवा शासनाचा अधिकार असणाऱ्या व्यक्तीला साहित्यात भाग घेण्याचा अधिकार आहे. परंतु तो त्या व्यक्तीचा राजकारणातील अधिकार बाजूला ठेवून.

१३) साहित्य संमेलनाध्यक्षांची निवड ही भूतपूर्व अध्यक्षांनी एकमताने करावी. मावळते अध्यक्ष, महामंडळाचे अध्यक्ष आणि ज्या गावी संमेलन होणार आहे त्या स्वागतसमितीचे अध्यक्ष या तिघांनी मिळून या संबंधीचे Administrative work करावे.

...६

# प्रा. अरविंद मंगरूळकर यांना श्रद्धांजली

प्रा. अरविंद गंगाधर मंगरूळकर यांचे मंगळवार दि. २७ मे १९८६ रोजी, पुणे येथे निधन झाले. त्यांच्या निधनामुळे पुण्यातील एक रसज्ञ पंडित कायमचा हरपला आणि त्यामुळे साहित्य–कला–संगीतादी क्षेत्रातील एक झगमगता दीप मालवला यात शंका नाही.

कै. मंगरूळकर साहित्य परिषदेचे सुमारे दहा वर्षे क्रियाशील कार्यवाह होते. कै श्री. म. माटे, चिं. वि. जोशी, के. नारायण काळे, श्री. के. क्षीरसागर, रा. शं. वाळिंबे अशा कार्याध्यक्षांसमवेत आणि कै. वा. दा. गोखले, गं. भा. निरंतर, वि. श्र्यं शेटे अशा कार्यवाहां-समवेत त्यांनी कार्यवाहपदाची जबाबदारी आपली अस्मिता राखून चांगल्या प्रकारे सांभाळली. परिषदेच्या कारभारविषयक आणि साहित्यविषयक कामात त्यांना रस होता. अभिजात संस्कृत वाङ्मय, जुने-नवे मराठी साहित्य, विशेषकरून व्युत्पत्ती, व्याकरण, शुद्धलेखना-सारखे जटिल प्रश्न, तसेच संगीत, चित्रनृत्यादी कला–या सर्व विषयांचा त्यांचा सखोल, सूक्ष्म अभ्यास होता आणि या विषयांसंबंधी ते जेव्हा बोलत किंवा लिहीत, तेव्हा त्यांच्या स्वतंत्र विचारांचा सर्वांना प्रत्यय येत असे.

तात्त्विक बाबतीत मंगरूळकर जितके आग्रही असत तितकेच ज्ञानसंचनयाचे बाबतीत मधुकरवृत्तीचे, अगदी विनयशीलसुद्धा असत. साहित्य-पत्रिकेत भाषा, व्याकरण, पाठचिकित्सा, मृत्युलेख, शब्दचित्रे, ग्रंथपरीक्षणे इत्यादी अनेक प्रकारचे त्यांचे लेखन प्रसिद्ध झालेले आहे. कालिदासाच्या शाकुंतलापासून ते पु. शि. रेगे यांच्या 'सावित्री 'पर्यंत आणि राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीपासून ते स्वतःच्या 'मराठीच्या व्याकरणाचा पुनर्विचार' या व्याख्यानरूप अभिनव ग्रंथापर्यंत त्यांच्या व्यासंगाचा आवाका होता. मम्मटविरचित 'काव्यप्रकाश' हा अर्जुनवाडकर आणि मंगरूळकर यांनी भाषांतरित केलेला विवेचक हजार पृष्ठांचा संपादित ग्रंथ चाळून आचार्य अत्रे स्तिमित होऊन गडबडा लोळले ही आख्यायिका नसून सत्य घटना आहे. गेली दोनएक वर्षे श्री. अग्नि-होत्री संपादित 'अभिनव मराठी– मराठी शब्दकोश' पूर्णतेला नेण्याच्या कामात ते गढलेले होते. त्या कोशाचा पाचवा– शेवटचा खंड मुख्यतः त्यांच्याच सूक्ष्म–भेदक दृष्टीखालून गेल्यामुळे तो पंचखंडात्मक कोश पूर्णतेला जाऊ शकला.

इतिहासाचार्य राजवाडे, प. ल. वैद्य, गो. कृ. मोडक, प्रि. सुरु, डॉ. रा. ना. दांडेकर, काही काळ ना. सी. फडके, गोविंदराव टेंबे, के. नारायण काळे, वा. ल. कुलकर्णी, वा. रा. ढवळे, वि. मो. केळकर अर्जुनवाडकर पतिपत्नी, वामनराव देशपांडे इत्यादी व्यक्तींच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष सहवासात रमणारा मंगरूळकरांसारखा रसिक ज्ञानो-पासक खरोखर विरळा. सुवाच्य, शुद्ध, दाणेदार अक्षरा-बद्दल आणि टापटीपीच्या अद्यावत राहणीबद्दल मंगरूळ-कर जितके प्रसिद्ध होते, तितकेच अक्षरवाङ्मयात सदैव बुडलेले आणि त्या वाङ्मयाचा इतरांना आस्वाद्य परिचय करून देणारे ललितलेखक म्हणूनही त्यांची ख्याती होती. साहित्य–संगीत–कलाक्षेत्रात त्यांचा एक दबदबा होता. त्यांचे आकर्षक, कलासक्त, ज्ञानमग्न, काहीसे मिजासखोर व्यक्तित्व आता अंतर्धान पावले असले तरी नाना कला नि विद्या प्रतिकूल परिस्थितीतही आत्मसात कशा कराव्यात, याबाबतचा त्यांचा आदर्श जाणकारांना तरी प्रेरक ठरणार आहे.

म सा. परिषदेची त्यांना विनम्र श्रद्धांजली.

**म. श्री. दीक्षित**

## साभार पोच : चरित्रे, आठवणी, शब्दचित्रे

**राजधानीतील १२ वर्षे** : द्वा. भ. कर्णिक; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ४० △ **मी डॉक्टर कसा झालो ?** : डॉ. डी. जी. पटवर्धन; प्रपंच प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ३५ △ **इंदिरा प्रियदर्शिनी** : मनोहर सरदेसाई; पुरोगामी प्रकाशन, करंजाळे, गोवा; १९८५; △ **वडिलांचे चरण-सेवेसी** : डॉ. सरोजिनी बाबर; समाज शिक्षणमाला, पुणे ३०; १९८६; रु. ३·५० △ **पोलादी पोप** : जोएल डिकुना; बसीन कॅथलिक बँक लि. पापडी, वसई (ठाणे); १९८६; रु. ६ △ **संतकवी खंडेराव गंगाखेडकरमहाराज** : डॉ. भीमाशंकर देशपांडे; सौ. सुभद्रा जहागिरदार, गुलबर्गा; १९८५; रु. ३ △ **पोप जॉन पॉल** : संदीप हळदणकर; मार्ग प्रकाशन, पुणे १; १९८६; रु. ५ △



# महाराष्ट्र साहित्य परिषद विभागीय साहित्य संमेलन, पुणे

## प्रा. वसंत कानेटकर यांचे

## अध्यक्षीय भाषण

## (२५ मे १९८६)

रसिक मित्रहो,

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीने, पुण्यात भरणाऱ्या या विभागीय सम्मेलनासाठी, अध्यक्ष म्हणून माझी एकमताने निवड केली, यात्रद्दल मी मनःपूर्वक ऋणी आहे. माझी पहिली 'घर' ही कादंबरी १९५० साली प्रसिद्ध झाली तेव्हापासून आजतागायत मी जे भलेबुरे लेखन केले, त्याला या अध्यक्षपदाच्या रूपाने आपण मान्यताच दिली असे मी समजतो. अर्थात माझ्या लेखनांतील गुणवत्ता मुळीच मान्य नसणारे वा 'वेतास वात' मान्य असणारे लोक नसतीलच असा माझा भ्रम नाही. इतरेजनांची गोष्ट सोडा, खुद्द माझ्याही अंगणात एका झाडावर दोन पक्षी बसलेले आहेत. फार पूर्वीपासूनच त्यांनी आपापली घरटी या झाडावर बांधली आहेत. मात्र हे पक्षी विश्राम वेडेकरांच्या झाडावरल्या पक्ष्यांपेक्षा खूपच वेगळ्या जातीचे आहेत. त्यांपैकी एक पक्षी अंमळ सोज्ज्वळ, सरळ, आणि एकमार्गी असून तो आजवर फक्त कलाकृतींच्या निर्मितीतच रममाण झालेला आहे. दुसरा पक्षी मात्र रंगरूपावरूनच नव्हे, तर कृती आणि उक्तीवरूनसुद्धा कोणालाही सहज ओळखण्यासारखा आहे. हा पक्षी काकदृष्टीचा असून सतत छिद्रे शोधून टोची मारीत असतो. तो वृत्तीने द्वाड, खटयाळ, पाणउतारा करण्यात आनंद मानणारा आणि कशालाही कधीही निर्भेळपणे चांगले न म्हणणारा, असा कुत्सित आणि छद्मी आहे. पहिला कधीही बोलत नाही आणि दुसऱ्याची वटवट कधी थांबत नाही. तरीही हा कावळा पहिल्या पक्ष्याला 'पोपट' संबोधतो आणि "पांढऱ्यावर काळे करण्यासाठी कशाला बाबा आटापिटा करतोस? तुझ्या चर्पटपंजरीत पूर्वसूरींचेच अनुभव, कल्पना आणि शब्दकळा येणार, ही काळ्या दगडावरची रेघ आहे." असे म्हणून त्याला हिणवीत असतो. आता या दोन्ही पक्ष्यांची मला सवय झाली असली तरी हा 'पंडित काकराज' किती खोडकर, खटयाळ आणि घालूनपाडून बोलणारा आहे, त्याची झलक तुम्हा रसिकमित्रांना दाखवण्याचे मी आज पक्के ठरवले आहे. एरवी खरं म्हणजे एक धोंडा भिरकवून या कावळयाला माझ्या झाडावरून उडवून लावणे, मला काही फारसे कठीण नाही. पण हा काकराज महामिष्कील आणि कडू बोलणारा असला तरी त्याचे भाष्य सर्वस्वी खोटे आहे असे मला म्हणवत नाही. शिवाय 'ऐकून घेण्याने काही आपल्या अंगाला भोके पडत नाहीत,' असा सुज्ञ विचार करून या दुष्टाचे सगळे गरळ मी निमूटपणे ऐकून घेत असतो.

हा पंडित काकराज मला म्हणतो—"साहित्यिकांचे सम्मेलन? मग निवडणूक कशी नाही? गटवार निरनिराळे पठ्ठे कसे मैदानात उतरले नाहीत? प्रचाराचा आणि प्रचारपत्रकांचा धुमधडाका कसा नाही? साहित्यिकांची साठमारी कशी नाही? कमीतकमी कोर्टदरबार, स्टे ऑर्डर कशी नाही? मग सम्मेलन गाजणार कसे? त्यात मौजमजा कशी येणार?" मी त्याला म्हटले की, "अरे बाबा, कार्यकारिणीवर निवडून आलेल्या सदस्यांनी विचारविनिमय करून अध्यक्षपद कोणाला द्यायचे हे ठरवले आहे. विभागीय सम्मेलनात हे असेच

असते." त्यांवर हा काकराज म्हणतो– "जे विभागीय सम्मेलनात चालू शकते ते महामंडळाने भरवलेल्या सम्मेलनात का चालू नये ? तेव्हा मी म्हणतो तेच खरे आहे. सम्मेलन गाजावे म्हणूनच ही निवडणुकीची रण-धुमाळी उडवण्यात येत असली पाहिजे." यावर मी विचारा काय वोलणार ?

या विभागीय सम्मेलनाचे उद्घाटन करण्यासाठी महाराष्ट्राचे अर्थमंत्री माननीय सुशीलकुमारजी शिंदे यांना आपण निमंत्रित केले ही मोठी औचित्यपूर्ण घटना आहे. सुशीलकुमारजी विद्वान आहेत; व्यासंगी आहेत; रसिकाग्रणी आहेत, आणि लोकप्रिय कर्तवगार नेते आहेत. माझ्या झाडावरला कावळा म्हणतो–"तरीसुद्धा ते मंत्री आहेत. त्याचे काय ?" शासनाचे प्रतिनिधी म्हणून मंत्रिमहोदयांचे आणि साहित्यिकांचे संवंध नेहमीच तणावपूर्ण असले पाहिजेत काय ? या माझ्या पृच्छेवर कावळा म्हणतो–"ते मला विचारू नकोस. साहित्यक्षेत्रातल्या तमाम उग्र साहित्यदुर्गा आणि दुर्गादास यांना विचार. अशाच एका पारितोषिक वितरण समारंभात एका साहित्यचंडिकेने केन्द्रीय मंत्र्यांच्या हस्ते पारितोषिक स्वीकारण्याचे तडफदारपणे नाकारले होते, हे तुला ठाऊक नाही काय ?" तो अगदीच नाटकी, असभ्य, आणि गैर प्रकार घडला असे माझे मत आहे. यजमानांच्या घरी एका पाहुण्याने दुसऱ्या पाहुण्याचा अपमान करण्यासारखा तो प्रकार घडला. त्यावर कावळा म्हणतो, "याचा अर्थ स्वाभिमान आणि वाणेदारपणा या गुणांची तुला कदर नाही असा होतो." त्यावर मी विचारले की, 'स्वाभिमान म्हणजे मार्जारीपणा आणि वाणेदारपणा म्हणजे उर्मटपणा असा तर तुझा अर्थ नाही ?" कावळा म्हणतो–'तसाच आहे. शब्दांचे अर्थ आता किंचित वदलले आहेत. सौजन्य म्हणजे लाचारी, परखडपणा म्हणजे शिवराळपणा, साधेपणा म्हणजे अस्वच्छपणा, निष्पापपणा म्हणजे वावळटपणा, असे इथे मराठीचिये नगरी नवे शब्दार्थ रूढ झाले आहेत. जिथे अनुदान, पुरस्कार वा शिष्यवृत्ती यांचा सवंध येत नसेल तिथे थोर मराठी साहित्यिक नेहमीच वाणेदारपणे वागतात." या पंडित काकराजाचे असेही म्हणणे आहे की वऱ्याचशा थोर साहित्यिकांना मंत्र्यांची एवढी 'अॅलर्जी' निर्माण होण्याचे खरे इंगीत वेगळेच आहे. मंत्री आले की पाठोपाठ गर्दी येते आणि ते गेले की सभामंडप ओस पडतो.। स्वतःच्या नावावर गर्दी खेचणारे कै. अत्रे, फडके, खांडेकर वा माटे यांच्या जवळपास येणारेही प्रभावी वक्ते आताच्या पिढीत उरले नाहीत, म्हणून हा सगळा गदारोळ आहे.' असल्या बेमुर्वतखोर कावळ्यापुढे कोणते शहाणपण सांगावे ? तरीदेखील पुरस्काराचे, सहृदयतेचे आणि रसिकतेचे एक नवे पर्व शासन आणि साहित्यिक संस्था यात निर्माण झाले पाहिजे आणि त्या दृष्टीने सुशीलकुमारजींची उद्घाटक म्हणून निवड औचित्यपूर्ण आणि योग्य अशीच आहे, असे माझ्याप्रमाणे सर्व रसिकजनांना त्यांचे भाषण ऐकल्यावर वाटले असेलच.

उत्कृष्ट कथाकाव्यादी ग्रंथांना राज्यपुरस्कार, प्रतिवर्षी भरणाऱ्या राज्यनाट्यस्पर्धा, नवोदितांच्या पुस्तकप्रकाशनास आर्थिक साहाय्य आणि कै. गडकरींसारख्या श्रेष्ठ साहित्यकाराच्या जन्मशताब्दीसाठी सक्रिय सहभाग यासाठी तरी, मंत्र्यांची 'अॅलर्जी' असणारे साहित्यकारसुद्धा शासनाचे मनःपूर्वक अभिनंदन करतील यात शंकाच नाही. लवकरच येणाऱ्या वालगंधर्वांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने शिक्षणमंत्र्यांनी ज्या सूचना मागविल्या आहेत, त्यात, वा नाटचपरिषदेला शासनाने जी जागा मुंवईला उपलब्ध करून दिली आहे त्यात, वा कविश्रेष्ठ कुसुमाग्रजांना जो पुरस्कार शासनाने गतवर्षी दिला आहे त्यातही शासनाची ही प्रगतीशील दृष्टी आणि साहित्यकारांच्या प्रतिष्ठेची जाण प्रत्ययाला येते. शासन आणि साहित्यकार यांच्या संवंधातील ही जमेची वाजू तथाकथित स्वाभिमानी आणि वाणेदार टीकाकारांना लक्षात घ्यावी लागेलच लागेल.

मात्र नाटकाची संहिता तपासून तिला मंजुरी वा नामंजुरी देणारे जे नाटचपरीक्षण मंडळ शासनाने नेमले आहे ते अजूनही रद्द होत नाही ही अत्यंत दुःखाची आणि शरमेची वाव आहे. १९७१ साली कुर्ला येथे भरलेल्या नाटचसम्मेलनाने प्रथम सेन्सार रद्द करावे असा ठराव मंजूर केला आहे. त्या वेळी मी माझ्या अध्यक्षीय भाषणात असे म्हटले होते की–... "कीचकवधावर वंदी आणणाऱ्या ब्रिटिशांच्या राजवटीचाच, हे सेन्सॉर वोर्ड, एक अखेरचा अवशेष आहे. या देशातून इंग्रज निघून गेले, पण जाता जाता आम्हा नाटकवाल्यांच्या डोक्यावर हा एक वरवंटा मात्र ठेवून गेले. नाटककाराची मुस्कटदावी करण्याचा अधिकार कोणत्याही तज्ज्ञांच्या मंडळालाही पोचू शकत नाही. कलेच्या परिसरातली भांडणे कलेच्या परिसरातच लढली गेली पाहिजेत. अखेर नाटचक्षेत्रातील उत्तम काय

आणि अधम काय, हे ठरवण्याचा अधिकार रसिकांचा आहे, टीकाकारांचा आहे. नाक्यावरच्या पोलिसाचा नाही की राज्याच्या गृहमंत्र्याचाही नाही. अशा स्थितीत, नाटककाराला वा नाटयकृतीला न्यायासनासमोर आरोपीच्या पिंजऱ्यात खेचण्याचा आपला हक्क राखून ठेवून राज्यशासनाने हे 'नियंत्रक मंडळ' तात्काळ बरखास्त करून टाकले पाहिजे..." सुमारे पंधरा वर्षांपूर्वी नाटयसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून मी जे हे उद्गार काढले होते ते आजही खरे आहेत. त्यात कानामात्राचाही फरक करण्याची मला गरज वाटत नाही. पण माझ्या मनातल्या झाडावर बसलेला तो द्वाड काकराज टोच मारून मला म्हणतो—

"थांबा महाशय. विद्वज्जनांच्या या सभेला एक महत्त्वाची आणि मनोरंजक माहिती देण्याचे टाळू नका. त्या वेळी तुम्हाला ती माहिती नसेल, पण आता एका वृत्तपत्राने ती वेशीवरच टांगली आहे. तेव्हा खरे काय ते सांगून टाका. गंमत अशी आहे की— नाटयपरीक्षण मंडळाचे अध्यक्ष गेली कित्येक वर्षे एक नामांकित मराठी नाटककार आणि दिग्दर्शक असून त्यांना या कामाबद्दल दरमहा चार आकड्यांतले घसघशीत वेतन व इतर भत्ते मिळत असतात. या परीक्षण मंडळातले इतर सदस्यही नामांकित साहित्यकार असून त्यांनाही भरपूर भत्ते व इतर खुराक विनबोभाट मिळत असतो. अतएवं सेन्सॉर बोर्डावर काम करून भरपूर मलिदा खावा आणि सम्मेलनात सेन्सॉर बोर्ड रद्द करण्याच्या ठरावालाही पाठिंबा द्यावा, असा दुतोंडी प्रकार वर्षानुवर्षे चालला आहे. मंत्र्यांबद्दल 'ॲलर्जी' दाखवणारे तमाम साहित्य—दुर्गादास आणि साहित्यचंडिका, या महाभागाची महापूजा कशी करणार आहेत?"

पंडित काकराजाच्या या मर्मभेदी सवालांवर कोण काय उत्तर देणार? अर्थमंत्र्यांना याबाबत एकच विनंती कराविशी वाटते की बोर्डावर काम करणाऱ्या सगळ्या सदस्यांची सगळी चंदी बंद करा आणि ते पैसे पुणे महानगरपालिकेला बालगंधर्व नाटयगृह चालवण्यातला तोटा भरून काढण्यासाठी द्या. एका दगडात दोन पक्षी मारण्याचे पुण्य त्यांना लाभेल याची मला खात्री वाटते.

काही छोटया प्रश्नांचा परामर्ष घेतल्यानंतर आता जरा मोठ्या समस्यांना सामोरे जायला हरकत नाही. इथेही आमच्या झाडावरला काकराज कावकाव केल्याविना राहणार नाही. पण त्याच्या आरटनाला किती महत्त्व द्यायचे हे शेवटी आपणच सगळे मुज्ञ ठरवणार आहोत. आजमितीला मराठी साहित्याची प्रकृती कशी आहे? काकराज म्हणतो—'थोर' मानल्या गेलेल्या ललित साहित्यकृतींच्या ग्रंथांचे गठ्ठे बाळगणाऱ्या आणि सवलतीच्या दराने ते लवकरात लवकर काढून टाकणाऱ्या प्रकाशकांना विचारा. मराठी वाचक काय वाचतो, आणि त्याला काय आवडते, ते गावोगावच्या लहानमोठ्या ग्रंथालयांना जाऊन पुसा. ते सांगतील की सर्वसामान्य वाचक केवळ करमणुकीसाठीच वाचतो आणि त्यासाठी त्याला मसालेदार कादंबऱ्याच लागतात. कथा एकवेळ चालतील. पण काव्य मात्र मुळीच नको, अशी त्याची धारणा आहे. अपवाद करायचाच झाला तर तो नाटकाचा करावा लागेल. नाटयपुस्तकांचा नव्हे, नाटयप्रयोगांचा. चित्रपट, टी. व्ही. व्हिडीओ यांचा हा परिणाम असण्याची शक्यता आहे. इंग्रजी माध्यमातून शिक्षणाचा प्रसार झपाट्याने होण्यामुळे इंग्लिशचा वाचकवर्ग वाढला असे नाही, पण मराठीचा मात्र निश्चितच रोडावत चाललाय. सत्यकथेसारखे मासिक बंद करावे लागावे ही फारच मोठी आणि बोलकी घटना आहे. सर्वसामान्य वाचकांना आणि प्रेक्षकांनाही गंभीर काही नकोय असेच नाही, तर गंभीरपणे कशालाही सामोरे जाणे नकोसे झाल्याचीच ही खूण आहे. पंडित काकराज म्हणतो की १८१८ साली पेशवाईच्या अखेरीस एकूण समाजाची, त्यातही बुद्धिमंतांची ही अशीच अवस्था झाली होती. बहुजनसमाज अडाणीच होता, पण जे अडाणी नव्हते त्यांचीही मजल करमणूक करणे आणि चंगळ उडवणे यापलीकडे पोचलेली नव्हती. सामान्य वाचकांचा विचार सोडून देऊ या. त्यांना चटकदार मिसळ पुरवणारे लेखकही घटकाभर विसरू या. मराठीतले श्रेष्ठ कवी, कथाकार, कादंबरीकार, नाटककार यांची निर्मिती कोणत्या तोलामोलाची आहे? काकराज म्हणतो— "या प्रश्नाचे उत्तर अर्धशतकापूर्वी कै. बा. सी. मर्ढेकरांनी 'वाङ्मयीन महात्मता' या ग्रंथात दिले आहे. ते म्हणतात, 'मराठी वाङ्मयाला जागतिक वाङ्मयात मानाचे तर राहोच पण नामाचेही स्थान नाही.' अर्ध शतकानंतर या परिस्थितीत फारसा बदल घडलेला नाही, एवढेच नव्हे, तर आजचे एक नामवंत टीकाकार डॉ. रा. भा. पाटणकर, आपल्या एका ग्रंथाच्या (कमल देसाई यांचे कथाविश्व) प्रस्तावनेत तर म्हणतात...'वाङ्मयांतील चांगलेपणाचे व मोठेपणाचे निकष

कोणते व त्या निकषानुसार गेल्या दीडशे वर्षातील वाङ्मय कितपत चांगले व मोठे ठरते, याकडे आपले लक्ष जाईल आणि या शोधाच्या अंती आपल्या पदरी फक्त विपण्णता येईल. या काळात एकसुद्धा मोठा लेखक, कोणत्याही वाङ्मय प्रकारात मोठी म्हणता येईल अशी एकसुद्धा परंपरा निर्माण झाल्याचे दिसत नाही. गेल्या दीडशे वर्षातली आपली कामगिरी इतकी दरिद्री का ?" असा प्रश्न त्यांनी उपस्थित केला आहे. मराठी तल्या निर्माणक्षम आणि गाजलेल्या, भारतीय भाषांतच नव्हे, तर जागतिक विविध भाषांत ज्यांच्या कलाकृती रूपांतरित झाल्या आहेत अशा साहित्यकारांना, डॉ. पाटणकरांनी हा फारच कडक आणि जलाल डोस दिला आहे. पण पाटणकरांच्या पृच्छेत परखड सत्य आहे हे मान्यच करावे लागेल. मराठी लेखकांच्यावर इंग्लिश साहित्याचा जेवढा जबरदस्त ठसा उमटला त्या तुलनेने जागतिक भाषांतील साहित्याबद्दल ते उदासीन राहिले; म्हणून त्यांची निर्मिती एकदेशीय आणि खुजी राहिली— असे मर्ढेकरांचे निदान होते. डॉ. पाटणकरांना ते फारसे मान्य नाही. मराठी साहित्य हे मूलतः मराठी मातीतून जन्माला यायला हवे. महाराष्ट्रीयत्व आणि भारतीयत्व, आजकालच्या मराठी साहित्यात अभावानेच दिसते ही त्यांची मुख्य तक्रार आहे. मराठी साहित्याला प्रेरक होणाऱ्या आजवरच्या सगळ्या चळवळी आणि विचारधारा या पाश्चात्य आणि त्यातही इंग्लिश साहित्यांतून आलेल्या, अतएव भारतीय वा महाराष्ट्रीय मातीशी कसलेही लागेबांधे नसणाऱ्या होत्या असा त्यांचा आक्षेप आहे. तो बव्हंशी खरा आहे. नवकाव्य वा नवकथा यांतील वैफल्यवाद वा थिएटर ऑफ द ॲबसर्ड- मधील निरर्थक शून्यवाद, या सरळ सरळ इंपोर्टेड प्रवृत्ती आहेत. त्यातून श्रेष्ठ कलाकृती कशा जन्माला येतील, हा प्रश्न विचारण्यात पाटणकरांनी अव्वल दर्जाची मार्मिकता दाखवली आहे. महाराष्ट्रातील विविध साहित्यप्रकार हाताळणाऱ्या कालच्या आणि आजच्या साहित्यिकांच्या प्रतिभेच्या सामर्थ्याबद्दल त्यांना मुळीच शंका नाही. फक्त त्यांचे आदर्श चुकले आहेत आणि परकीय मातीतून कसदार पीक काढण्याची त्यांची धडपड वांझोटी आहे, असा त्यांचा दावा आहे. माझ्या झाडावरला काकराज म्हणतो– " डॉ. पाटणकरांना विचारायला हवे की ज्याला ते 'भारतीयत्व ' म्हणतात ते मूल्य, ठामपणे या मातीत सापडायला, ते मुळात अस्तित्वात तरी आहे का ? 'India was never a nation; it became a nation only under British rule.' ही चर्चिलची दर्पोक्ती आम्हाला इंगळी सारखी डसली, झोंबली तरी ती संपूर्णपणे खोटी आहे असे ठणकावून सांगता येईल का ? स्वातंत्र्य मिळून चार दशके उलटली तरी भारताचे 'राष्ट्रीयत्व ' अजून पुरते सिद्ध आणि साकार व्हायचे आहे. पंजाब काय, नागालँड काय, वा दक्षिणेतली राज्ये काय– सगळेच फुटीरतेच्या दडपणाखाली वावरताहेत. महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या सीमाप्रश्नाबद्दल, उभय राज्यांच्या नेत्यांची वक्तव्ये तपासली तर दोन शत्रुराष्ट्रांचे पुढारी वल्गना करीत घोषणा आणि धमकी देताहेत असे वाटते. तेव्हा 'राष्ट्रीयत्व ' मग ते भारतीय असो वा महाराष्ट्रीय असो, त्याबद्दल जरा जपूनच बोलणे बरे. ज्या मातीतून इथली माणसे घडतात, वाढतात, त्या मातीची आणखी काही लक्षणे तपासण्यासारखी आहेत. आजच्या भारतीय समाजाला भ्रष्टाचाराचा कॅन्सर जडला आहे. शिक्षणापासून सैन्यापर्यंत आणि रुग्णालयापासून कारखानदारीपर्यंत समाजजीवनाचे असे एक अंग उरले नाही की जे या भ्रष्टाचाराने ग्रासलेले नाही. हेरगिरीची प्रकाशात आलेली प्रकरणे ही नुसती झलक आहे. फूटहील्सपर्यंत आलेले चिनीसैन्य एकतर्फी माघारी गेले त्या वेळी माओला पत्रकारांनी विचारले की 'भारताला तुम्ही घाबरलात काय ?' त्या वेळी तो म्हणाला– "भारत जिंकणे हा केवळ दोन दिवसांचा प्रश्न आहे. कारण त्या देशात विकत घेता घेता येत नाही असा एकही माणूस नाही !" माझ्या मनातला काकराज म्हणतो–" त्यात नवल ते काय ? ही तर या देशाची पूर्वापार प्रकृती आहे. पेशवाई खालसा करताना पुण्यातल्या शास्त्री-पंडितांना माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन्ने असेच दक्षिणा देऊन विकत घेतले होते. अतएव इथल्या मातीचा कस कधीच संपला आहे. आता ती विपारी क्षारयुक्त आणि दलदलीची जमीन झाली आहे. इथल्या पाण्यात हायसिंथ आणि मातीत गाजरगवत तेवढे अमाप उगवते. या दीड वितीच्या दुनियेत श्रेष्ठ माणसेच घडत नाहीत तर थोर कलाकृती कोठून उपजणार ? या मातीला जणू असा शापच दिसतो, की पारतंत्र्यात इथे फकीरी बाण्याने सर्वस्व उधळून समाजाला घडवणारी डोंगराएवढी थोर माणसे उपजावीत आणि स्वातंत्र्य मिळाले रे मिळाले की बघता बघता

ही माणसे नाहीशी होऊन इथे फक्त पोटभरू आणि विनकण्याच्या माणसांचे गाजरगवत तेवढे उदंड माजावे. असल्या मातीत -शेक्सपीयर आणि टॉलस्टॉय तरी काय पिकवू शकतील ? माझ्या झाडावरला तो द्वाड कावळा मला टोच मारून म्हणतो– " आता श्रेष्ठ कलाकृती मराठीत घडण्याचा एकमेव मार्ग आपल्या साहित्यकारांना उपलब्ध आहे. तो मार्ग म्हणजे राजरोस वाङ्मयचौर्य. आता जीवनाच्या सर्वच क्षेत्रात चोरीचा मामला प्रतिष्ठा पावला असल्याने, वाङ्मयचौर्याविषयी 'हळूहळू बोंबला' म्हणून इशारा देण्याचीही गरज उरली नाही. वाङ्मयचौर्याचे गुन्हे शोधून काढण्यात तरबेज असलेले फौजदार आणि आमचे ज्येष्ठ समीक्षक मित्र माधव मनोहर हे सुद्धा आता म्हणू लागले आहेत की " चोरी करायची असेल तर खुशाल करा. पण बाबांनो नीट करा. मूळ कलाकार आणि कलाकृती यांचा मुडदा न पाडता त्यातले सत्त्व आणि सामर्थ्य सांभाळून करा." इथे मला एक किस्सा आठवतो. मराठीतले एक लोकप्रिय नाटककार –आता ते हयात नाहीत, पण ते आपल्या नाटकातून इतर लोकप्रिय नाटककारांच्या नाटकांतील संवाद, प्रसंग आणि व्यक्तिरेखा दडपून वापरीत असत. आणि कोणी त्याबद्दल जाब विचारलाच तर ठणकावून सांगत की अमुक अमुक लेखक माझ्या 'हृदयस्थानी' आहेत. त्यामुळे त्यांचे संवाद, प्रसंग वा व्यक्तिरेखा माझ्या नाटकात झिरपणे अगदी अपरिहार्य आणि स्वाभाविकच आहे. पंडित काकराज मला म्हणतो की " आता मराठीतल्या सगळ्या लेखकांनी, असे नामवंत महर्षी निवडून त्यांना आपल्या हृदयस्थानी ठेवावे, म्हणजे महान कलाकृतींचा मराठीत हां हां म्हणता सुकाळ होऊन जाईल."

पण अडचण अशी आहे की आजकाल जगातील देशोदेशींच्या वाङ्मयात तरी अभिजात आणि श्रेष्ठ अशा कलाकृती कोठे निर्माण होताहेत ? काही अपवाद वगळता सगळी साहित्य उद्याने 'बेस्टसेलर्स' च्या चित्रविचित्र फुलांनी बहरली आहेत. 'क्लासिक्स' चे मळे मात्र उजाडच पडले आहेत. आजकाल काय जीव ओतून निर्माण केले जाते आणि काय धुंदीने झपाटून वाचले जाते, याचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे मारिओ-पूझोची 'गॉडफादर' ही कादंबरी. चटकदार, मुक्त श्रृंगारिक आणि सनसनाटी हिंसाचारी साहित्याची आवड, हा आजचा युगधर्मच आहे. अणुयुद्धाच्या धास्तीमुळे भयग्रस्त झालेल्या मानवसमाजात यापेक्षा दुसरी कशाची अपेक्षा करता येणार ? म्याड माणसे वेळ घालवण्यासाठी वा भय विसरण्यासाठी करमणुकीची साधने निर्माण करू शकतात. पण जीवनावर गाढ श्रद्धा आणि मानवी संस्कृतीवद्दल अविचल निष्ठा असल्याशिवाय टॉलस्टॉयसारखी ग्रंथसंपदा निर्माण करता येत नाही. तीव्र अंतःकलह आणि प्रचंड भय हे उभ्या जगाचेच मानसिक दुखणे झाले आहे. हे असे का व्हावे ?

अणुयुद्धाचे घोर परिणाम कोणाला माहीत नाहीत ? अणुयुद्धासाठी कोण आतुर झाले आहे ? हे सर्वनाशक युद्ध कोणालाही नको आहे आणि तरी ते दिवसेंदिवस अटळ होत चालले. म्हणूनच भावी युद्ध हा केवळ राजकारणी नेत्यांचा वा लष्करी योध्दयांचा प्रश्न राहिला नाही. ज्याला म्हणून विचार करता येतो त्याची मती कुंठित करणाऱ्या एका कोंडीत उभी मानवजात सापडली आहे. हे असे का व्हावे ? जगातले सगळे राष्ट्रनेते तळमळीने एकच विचार सांगताहेत आणि तरी त्यांना शांततेचा मार्ग सापडत नाही, याचे मूळ कारण काय असेल बरे ?

ही असाधारण परिस्थिती काही राजकीय मनप्रणालींच्या संघर्षातून वा लष्करी डावपेचातून वा कोणाच्या फाजील महत्त्वाकांक्षेतून निर्माण झालेली नाही. त्याचे मूळही पुन्हा मानवी स्वभावातच आहे. मानवी स्वभाव घडवणाऱ्या मानवी मेंदूच्या रचनेत आहे. आज माणूस जसा आहे तसा त्याला घडवणाऱ्या निसर्गातील उत्क्रांतीच्या प्रेरणेतही आहे. मित्रहो, माझ्या विवेचनाच्या या अखेरच्या महत्त्वाच्या टप्प्यावर मी साहित्यमीमांसेपासून अमळ दूर जातो आहे असे आपणास वाटेल. पण साहित्यधारणेची मूलगामी मीमांसा करण्यासाठी तरी भाषा, विज्ञान आणि कला यांना जन्म देणाऱ्या मानवी मेंदूचा शोध घेणे आवश्यकच आहे. एका मानववंश शास्त्रज्ञाने असे उद्गार काढले आहेत की माणूस हा 'माणूस' म्हणून या सृष्टीत उभा राहिलेल्या दिवसापासून आजतागायत, तो कधीही शस्त्र हाती धरल्याशिवाय जगलेला नाही. फरक इतकाच की कधी काळी ही शस्त्रे दगडाची होती; आज तो अण्वस्त्रापर्यंत पोचलेला आहे. माणूस हा हाडाचाच 'शिकारी' आहे. त्याचा सगळा संस्कृतिविशेष ही मूलतः एका शिकाऱ्याची कमाई आहे. मानवापुढे निर्माण झालेले



अनुक्रमणिका

आजचे प्रश्न मात्र शिकाऱ्याने सोडवावेत इतके ढोबळ आणि सोपे राहिले नाहीत. ते सोडवायला तत्त्वज्ञानाचीच कास धरावी लागेल. प्रश्न असा आहे की हा शिकारी कधी काळी तत्त्वज्ञ होणार आहे की नाही ?

आॅर्थर कोस्लर हे विसाव्या शतकातले फार मोठे विचारवंत, सामाजिक संशोधक आणि ललित लेखक होऊन गेले. अलीकडेच काही वर्षांपूर्वी त्यांचे निधन झाले. १९७८ साली त्यांनी 'जेनस—अ समिंग अप' नावाचा एक महत्त्वाचा ग्रंथ लिहून प्रकाशित केला. या ग्रंथात गेल्या पावशतकभर त्यांच्या मनात चाललेल्या मंथनाचे दर्शन घडवणारे, मानवाच्या भवितव्याबद्दलचे अनेक लेख त्यांनी संग्रहित केले आहेत. मानवी मेंदू, त्याची शक्ती, त्याच्या मर्यादा आणि त्याची उत्क्रांती हा त्यांनी आपल्या विशेष अभ्यासाचा विषय केला आहे. आॅर्थर कोस्लर यांनी काही स्फोटक सिद्धांत मांडले आहेत आणि मानवाच्या भवितव्याबद्दल काही जबरदस्त निष्कर्ष साधार काढले आहेत. मित्रहो, माझ्या विवेचनाला आधारभूत होईल इतकाच मी त्यांच्या विचारधारेचा व संशोधनाचा परिचय करून देणार आहे. पण आपण सर्वांनी हा ग्रंथ मुळातून वाचावा अशी माझी जोरदार शिफारस आहे. विचारवंताच्या विश्वात एवढी खळबळ उडवून देणारा दुसरा ग्रंथ गेल्या कित्येक वर्षांत मी वाचलेला नाही. आज पाच-सहा वर्षे मी या ग्रंथाच्या वाचनात आणि चिंतनात गुंतलो आहे आणि त्याच्या अभ्यासाने प्रत्येक वेळी मला नवे नवे शोधबोध होत आहेत.

तर 'जेनस—अ समिंग अप' या ग्रंथात कोस्लर म्हणतात की— सरपटणाऱ्या जनावरातून चतुष्पाद प्राण्यात आणि त्यातून पुढे माणसात, असा मनुष्याचा उत्क्रांतीचा प्रवास आहे. यापैकी पहिल्या अवस्थांतरात सरपटणाऱ्या जनावराच्या मेंदूचेसुद्धा चतुष्पाद प्राण्याच्या अवस्थेशी मिळतेजुळते रूपांतर म्हणजे ट्रान्सफॉर्मेशन झाले. पण चतुष्पाद प्राण्यातून माणूस उत्क्रांत होत असतांना, मेंदूमधे हे नव्या रूपाशी मिळतेजुळते परिवर्तन न घडता जुन्या मेंदूवर नवा मानवी मेंदू नुसता टोपीसारखा (superimposed) बसवला गेला. या मेंदूलाच कोस्लर 'थिंकिंग कॅप' म्हणतात. जुन्या मेंदूकडे भावना, वासना, इच्छाशक्ती आणि नव्या मेंदूकडे फक्त विचारशक्ती अशी विभागणी झाली आणि या दोन मेंदूमधे अगदीच मामुली सहकार्य राहिले. परिणामी भाषा, विज्ञान, कला यासारख्या प्रांतात मानवी मेंदू प्रचंड पराक्रम करू लागला आणि नेत्रदीपक विकास साधू लागला. पण भावना, वासना, इच्छाशक्ती याबाबत प्राणीअवस्थेतील जुन्या मेंदूचेच प्राबल्य राहिले. परिणामी माणूस दुभंग झाला. त्याची आजची सगळी शोकांतिका या दुभंगतेतूनच निर्माण झाली आहे. 'कळते पण वळत नाही' हा शब्दप्रयोग आपण नेहमी वापरतो. भ्रष्टाचार करू नये ही नैतिक प्रेरणा नव्या मेंदूची असली तरी ती धुडकावून राजरोस भ्रष्टाचार करायला लावणारी हुकमत चालते ती जुन्या मेंदूची- नव्या मेंदूत गांधीजी, बुद्ध, ख्रिस्त असले तरी जुन्या हुकमत गाजवणाऱ्या मेंदूत मात्र वाघ, लांडगा, कोल्हा आणि सुसर हेच आहेत. नवा मेंदू आण्विक शक्तीचा शोध लावतो पण जुना मेंदू त्या शक्तीचा संहारक बॉम्ब तयार करणे त्याला भाग पाडतो.

ओठावर गोड शब्द, पोटात लबाडी, अप्पलपोटेपणा, दुसऱ्याचे हिरावण्याची इच्छा, दुष्टता, क्रूरता हे सगळे शिकारीगुण म्हणजे माणसाला जुन्या मेंदूचे शाप आहेत. तर प्रचंड तांत्रिक प्रगती, कलाविलास, विविध शास्त्रांचा विकास आणि 'सत्यं शिवं सुंदरम्'ची सर्वंकश जाण ही नव्या मेंदूची माणसाला देणगी आहे. पण एकाच देहातल्या या दोन मेंदूत सहकार्य नाही आणि जुन्या मेंदूच्या वर्चस्वाखालीच नव्या मेंदूचे सगळे व्यापार होत राहतात, इथेच माणसाच्या विनाशाचा प्रारंभ झाला आहे. माणूस निर्माण झाल्यापासून आजतागायत पशुत्वानेच मनुष्यत्वावर मात केली आहे आणि आत्मसंहार हे त्याचे विपारी फलित आहे. नव्या मेंदूमुळे माणूस चंद्रावर जाऊ शकला असला तरी जुन्या मेंदूपायी पूर्व बर्लिनमधला माणूस पश्चिम बर्लिनमध्ये जाऊ शकत नाही. माणसामाणसातील संबंधातील संशय, कटुता, द्वेष, तिरस्कार, तुच्छता, लबाडी, ढोंग, गुलाम करण्याची वृत्ती, दुसऱ्याच्या छळात आनंद मानण्याची बुद्धी हा जुन्या मेंदूचा शापच आज प्रभावी ठरला आहे. कारण नव्या मेंदूची सगळी शक्ती जुन्या मेंदूने या आसुरी राक्षसी संहारकर्माकडे वेचून कामाला लावली आहे. आॅर्थर कोस्लर म्हणतात, की ६ ऑगस्ट, १९४५ या दिवशी हिरोशिमा नागासकी बेटावर अॅटमबॉंब टाकून माणसाने आत्मसंहाराच्या दिशेने पहिले पाऊल निश्चितपणे उचलले आहे. तेव्हापासून त्याची वाटचाल याच दिशेने कमीअधिक वेगाने पण निश्चयाने चालली आहे.

आता तर आण्विक अस्त्रे, माणसानेच घडवलेल्या यांत्रिक मेंदूकडे म्हणजे कॉम्प्यूटरकडे सुपूर्त झाली आहेत. त्यामुळे यंत्रमानवाची एक लहानशी चूकसुद्धा पहिल्या धडाक्यात जगाची राखरांगोळी करून टाकण्याचे भय निर्माण झाले आहे. याचा अर्थ काय आहे? निसर्गाचा 'माणूस' घडवण्याचा प्रयत्न या पृथ्वीतलावर फसला आहे का? या प्रश्नाला कोस्लर यांचे 'होय' असे उत्तर आहे. ट्रायल आणि एरर ही मुळी निसर्गाच्या उत्क्रांतीप्रक्रियेची मुख्य लक्षणेच आहेत. निसर्गाच्या हिशेबी आणखी एक चूक, एवढेच फार तर त्याचे रूप असले, तरी माणसाचे मात्र उभे अस्तित्वच आज धोक्यात आले आहे. मानवी मेंदूची ही दुभंगता चिरकाल राहील असेही नाही. उत्क्रांतीच्या प्रक्रियेत निसर्गच आपल्या प्रयोगात दुरुस्ती करीलसुद्धा. पण प्रश्न असा आहे की माणसाला तेवढी सवड कुठाय? जगाला आण्विक अस्त्रांचे कोठार करून कधी एकदा भडका उडवता येईल याची तो जणू वाटच पाहतो आहे.

एखाद्या दालनात उनाड मुले खेळत असावीत; त्या दालनात ज्वालाग्रही वायू भरलेला आहे आणि प्रत्येक मुलाच्या हातात मॅचबॉक्स आहे. मात्र एक वृद्ध शहाणा साधू या मुलांना 'चुकूनसुद्धा काडी ओढू नका' म्हणून पुनःपुन्हा बजावतो आहे. अशा स्थितीत ते दालन, ती मुले, किती काळ सुरक्षित राहू शकतील? कोस्लर म्हणतात, आजचे जग तेवढेच सुरक्षित आहे. पण मग यावर इलाज काय? या सर्वनाशाची केवळ हताशपणे वाट बघतच मानवजातीने जगत राहायचे आहे काय? परिस्थिती एवढी शंभर टक्के निराशाजनक असेल असे मला वाटत नाही. काय होणार आहे त्याबद्दल बांधलेले अंदाज हे अखेर अंदाजच असतात आणि परिस्थितीला कालौघात अगदी वेगळी कलाटणी मिळण्याची शक्यताही नाकारता येत नाही.

क्यूबाचा प्रश्न निर्माण झाला त्या वेळी जग अणुयुद्धाच्या कडेलोटावर येऊन ठेपले होते हे आपणा सर्वांना माहीतच आहे. त्या वेळी जे घडले तिथेच कुठेतरी मानवजातीचे आशास्थान आहे. युद्धासाठी सज्ज झालेल्या दोन महासत्तांना अखेरच्या क्षणी शहाणपणा सुचला. मनुष्यत्वाने पशुत्वावर मात केली. कोणाचा विजय झाला, कोणी माघार घेतली हे प्रश्न क्षुद्र आणि निरर्थक आहेत. पण विचारशीलतेने वैरभावनेला तात्पुरते का होईना पण रोखण्यात यश मिळवले, ही फार मोठी दिलासा देणारी घटना आहे.

'द डे आफ्टर' नावाचा, युद्धानंतर जगाची उद्ध्वस्त अवस्था कशी होईल याचे चित्रण करणारा, एक प्रत्ययकारी चित्रपट अलीकडेच अमेरिकेच्या अध्यक्षांनी पाहिला, तेव्हा ते कमालीचे अस्वस्थ आणि व्यथित झाले असे म्हणतात. या व्यथित होण्यानच या राक्षसी संहाराला थोपवण्याचा छोटासा पण गुणकारी इलाज आहे. चित्रपट हे सुद्धा अखेर साहित्याचेच एक रूप आहे. आणि जीवनदर्शनातून माणसाला शहाणे करणे, हा श्रेष्ठ साहित्याचा मुळी जन्महेतू आणि धर्मच आहे. या धर्माशी जगातले सगळे साहित्यकार सनातन काळापासून वचनबद्ध आहेत. उभी मानवजात अत्यंत वैफल्यदायक, वास्तवात आजचे दिवस कंठीत असली तरी उद्याची स्वप्ने पाहणे हीच तिची एकमेव आशा आहे. उद्या जगबुडी होणार आहे हे कळले, तरी भुकेलेला माणूस तेवढ्यासाठी निराशेने आजच्या पानावरून काही उठून जात नाही. उठून जात नाही याचे कारण, उद्यापर्यंत बरेच काही घडू शकेल, या आशादायक स्वप्नातून त्याची सुटका होत नाही. श्रेष्ठ साहित्यकार हे सहृदय नीतीचे जसे शिल्पकार असतात तसेच असल्या सुंदर शहाण्या स्वप्नांचे निर्मातेही असतात. पारतंत्र्याच्या तमोयुगात भारतीय समाजाला घडवण्यासाठी आयुष्ये भिरकावणाऱ्या एकोणिसाव्या शतकातील धुरिणांच्या जवळ दुसरी कोणती शक्ती होती? अशाच काळात इतिहासाचार्य राजवाड्यांनी एक महत्त्वाचा संदेश दिला आणि तो प्रत्यक्ष कृतीत आणला त्याचे मला या क्षणी स्मरण होते. ते म्हणत, समाजाची ही शिलावस्था नाहीशी व्हावी एवढ्यासाठी उभ्या समाजाचे मंडळीकरण झाले पाहिजे. 'मंडळीकरण' म्हणजे निरनिराळ्या क्षेत्रात विचारमंथन करणाऱ्या माणसांच्या छोट्यामोठ्या संस्था निर्माण झाल्या पाहिजेत. वारंवार निमित्ते शोधून माणसांनी एकत्र आले पाहिजे आणि समाजाच्या उर्जितावस्थेबद्दल सतत एकमेकात संवाद साधला पाहिजे. एवढ्या एकाच हेतूने त्या उग्रप्रकृती थोर महात्म्याने इतिहाससंशोधन मंडळापासून ते रेल्वे पॅसेंजर्स असोसिएशनपर्यंत सुमारे पाऊणशे संस्था आपल्या हयातीत स्थापन केल्या होत्या. साहित्यासह विविध क्षेत्रांतली संमेलने हासुद्धा त्या मंडळीकरणाचाच एक प्रपंच आहे. भारतीय

...७

समाजाला आज पुन्हा एकदा पेशवाईच्या अखेर आली होती तशीच 'शिलावस्था' आली आहे ही गोष्ट आहे. पशुत्वावर मनुष्यत्वाची मात ही काही दैवी चमत्काराने साध्य होणारी घटना नाही. त्यासाठी माणसातल्या पशूचे प्रबोधन होणेच जरूर आहे. कै. मानवेंद्रनाथ रॉय यांनी आपला पक्ष ज्या कारणासाठी बरखास्त केला आणि नवमानवतावादाचा (New Humanism) जो आदेश आपल्या अनुयायांना दिला होता, त्या पाठीमागे हीच विचारधारा होती काय? असेलही. माणसाचे व्यक्ति-पातळीवरले प्रबोधन आणि विकास हा कदाचित कंटाळ-वाणा आणि लांबचा मार्ग असेल. पण ज्या प्रगल्भतेची (Maturity) आणि शहाणपणाची (Wisdom) साधना केल्यावाचून मानवजातीला आता गत्यंतर नाही, तो मार्ग असाच कष्टसाध्य आणि धैर्याची कसोटी पाहाणाराच आहे. या मार्गाला आज तरी दुसरा शॉर्टकट् नाही.

•

या मानवी प्रबोधनात विज्ञानाप्रमाणेच ललित-साहित्याचाही फार मोठा वाटा आहे आणि असला पाहिजे. ग्रीकांनी रंगमंचावर उभारलेला ट्रॅजिडी हा नाट्यप्रकार प्रथम धर्मसत्तेच्याच हाती होता. सामान्य माणसाला धाकात ठेवण्यासाठी निर्माण झालेला हा वाङ्‌मयप्रकार अखेर ग्रीक धर्मगुरूंच्या हातून निसटला आणि कवींच्या हाती तो स्वतंत्रपणे उमलत गेला ही घटना फार बोलकी आहे. धर्मसत्तेला वा राज-सत्तेला नाटकासारख्या साहित्य प्रकाराबद्दल जे एवढे प्रेम निर्माण झाले, तो काही मानवजातीच्या मुक्ती-बद्दल कळवळा आला होता म्हणून नाही. साहित्याच्या अंगभूत एक मंत्रशक्ती आहे. माणसाला अंकित करण्याची नाहीतर शहाणे करून मुक्त करण्याची. सगळे धर्मगुरू आणि राजसत्ताधारी यांना या शक्तीचे पहिले रूप हवे होते. 'सज्जनास पारितोषक आणि पापास प्रायश्चित्त' एवढाच धाक ग्रीक धर्मगुरूंना अभिप्रेत नव्हता. आम्ही सांगतो ते पाप, आणि आम्ही म्हणू ते पुण्य...'का' म्हणून विचारायचे नाही– हाही धाक त्यांना अभिप्रेत होता. त्यांच्या जोखडाखालून नाटककार निसटले आणि स्वतंत्र झाले म्हणून तर माणसाच्या दुःखाची विविध रूपे, त्यातले स्तर आणि पदर, त्यातला व्यक्तिविरुद्ध नियती हा संघर्ष चित्रित करून ते माणसाला प्रगल्भ (Mature) आणि शहाणे (Wise) करू शकले. लहानातल्या लहान ललित लेखकालासुद्धा आज या मंत्रशक्तीचे पक्के भान असण्याची गरज निर्माण झाली आहे. मराठीतल्या दलित साहित्याच्या एका अपरिहार्य जोरदार नव्या प्रवाहाचे महत्त्व मला का वाटते ते याच संदर्भात सांगणे जरूर आहे. कालमानानुसार समाजातल्या तळागाळा-तले लोक संतापून उठले आणि त्यांनी विद्रोहाचा आक्रमक पवित्रा घेऊन आपली व्यथा आणि वेदना 'कठीण शब्द धोंड्याची, करतो हाणाहाण' या केशवसुत उक्तीप्रमाणे आपली नवरचना आरंभली आणि आपले साहित्य-शास्त्रही वेगळे मांडण्याचा दावा केला, यात तसे नवल-विशेष काहीच घडले नाही. नव्यांनी सनसनाटी भाषेत जुन्यांना मोडीत काढायचे आणि आपले चैतन्यकर्तृत्व जगावेगळे असल्याचे ठणकावून सांगायचे, हे साहित्य-विश्वात गेल्या शंभर वर्षांत नेहमीच घडत आले आहे. प्रत्येक साहित्यिक चळवळीच्या प्रारंभी 'जुने जाऊ द्या मरणालागुनी' ही तुतारी नेहमीच फुंकली गेलेली आहे. केशवसुत, रविकिरण, क्रांतिकवी, नवसाहित्य या प्रत्येक चळवळीच्या वळणावर जे घडले होते तेच आज काल विद्रोहवादी दलित साहित्यकार करीत आहेत. मला त्यांचे अप्रूप वाटते ते फार वेगळ्या कारणासाठी. वेदना वेशीवर टांगण्यासाठी त्यांनी फरशी, बंदूक वा मशाल हाती घेतली नाही, तर ते शब्दांना सामोरे गेले. साहित्य-निर्मितीच्या प्रक्रियेत व्यथावेदना सुद्धा शांतगंभीर होतात आणि एकाच वेळी त्या कलाकाराला आणि रसिकाला 'जागे' आणि म्हणून 'शहाणे' करतात. 'बलुतं,' 'उपरा,' 'मुक्कामपोष्ट देवाचे गोठणे,' 'काटचावरची पोटं,' आणि अलीकडचं प्रसिद्ध झालेलं 'बंद दरवाजा' हे ग्रंथ एका नव्या 'शांतक्रांती'ची नांदी गात आहेत असं मला वाटतं. 'शांतक्रांती' हा परवलीचा शब्द आहे. कोस्लर ज्या मानवाची दुभंगलेली शोकांतिका सांगतात, तिच्यावरलाच हा एक उःशाप आहे. समाजप्रबो-धनात आपण नेमक्या कोणत्या जागी उभे आहोत आणि आपल्या हाती या लेखणीरूपी जादूच्या कांडीत कोणती सुप्त सामर्थ्ये आहेत याची जाण महत्त्वाच्या दलित लेख-कांना निश्चितपणे झाली आहे. त्यांना पूर्णपणे उमज पड-लेला आहे की सत्ताधाऱ्यांचा राजदंड नव्हे, सैनिकांची बंदूक नव्हे की क्रांतिकारकाच्या हातातली चूड नव्हे, तर समर्थ आणि समर्पित लेखकांच्या हातातली लेखणी, हाच अखेर माणसाने माणसाला दिलेला खराखुरा उःशाप आहे. ▭

## चवथ विभागीय साहित्य संमेलन
## आणि ८० वा वर्धापनदिन समारंभ
## : क्षणचित्रे :



**संमेलनाध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांचे स्वागत :**
डावीकडून परिषदेचे कोषाध्यक्ष श्री. म. श्री. दीक्षित, अध्यक्ष श्री. शंकर पाटील, श्री. श्याम कोपर्डेकर, कार्यवाह श्री. राजा फडणीस, कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी




**स्वागताध्यक्षांचे भाषण : श्री. शंकर पाटील**

अनुक्रमणिका








**संमेलनाचे उद्घाटन :**
श्री. सुशीलकुमार शिंदे दीप प्रज्वलित करून संमेलनाचे उद्घाटन करीत आहेत.



**उद्घाटकांचे भाषण :** श्री. सुशीलकुमार शिंदे

अनुक्रमणिका



**अध्यक्षांचे भाषण :** प्रा. वसंत कानेटकर



**कथाकथन :** प्रा. द. मा. मिरासदार, श्री. शंकर पाटील, श्री. वसंत सबनीस
परिषदेचे कार्यवाह डॉ. म. वि. गोखले कथाकारांचे स्वागत करीत आहेत



**परिसंवाद :** ‘नियतकालिकांना भरती, दर्जेदार साहित्याला ओहोटी’. व्यासपीठावर परिसंवादातील वक्ते आणि अध्यक्ष. डावीकडून प्रा. स. शि. भावे, डॉ॰ सरोजिनी वैद्य, प्रा. गंगाधर पानतावणे, अध्यक्ष प्रा. माधव मनोहर, श्री. एस्. के. कुलकर्णी आणि प्रा. म॰ द. हातकणंगलेकर




**काव्यवाचन :** कविवर्य वसंत बापट, मंगेश पाडगावकर, विंदा करंदीकर



महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिकाचे पहिले मानकरी **कविवर्य विंदा करंदीकर** यांचे साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी स्वागत करीत आहेत. मध्ये कार्यवाह श्री. राजा फडणीस



**८० वा वर्धापनदिन समारंभ :** व्यासपीठावर डावीकडून म. सा. पत्रिकेचे संपादक डॉ. वसंत. स. जोशी, कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी, कोषाध्यक्ष श्री. म. श्री. दीक्षित, कविवर्य विंदा करंदीकर, संमेलनाध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर, वर्धापनदिन समारंभाचे अध्यक्ष श्री. विठ्ठलराव गाडगीळ, परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील आणि कार्यवाह श्री. राजा फडणीस











**स्मरणिकेचे प्रकाशन :**
'साहित्यादर्श' या स्मरणिकेचे संमेलनाध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर प्रकाशन करीत आहेत.



**महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिकाचे वितरण :**
संमेलनाचे अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर कविवर्य विंदा करंदीकर यांना मानचिन्ह देत आहेत. शेजारी कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी.

अनुक्रमणिका




वर्धापनदिन समारंभाचे अध्यक्ष श्री. विठ्ठलराव गाडगीळ यांचे भाषण




महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिकाचे पहिले मानकरी कविवर्य विंदा करंदीकर यांचे भाषण



**८० वा वर्धापनदिन समारंभ :** डावीकडून बसलेले : कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी, प्रा. वसंत कानेटकर, श्री. विठ्ठलराव गाडगीळ, कविवर्य विंदा करंदीकर, श्री. शंकर पाटील, सौ. ज्योत्स्ना देवधर उभे : डॉ. म. वि. गोखले, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वसंत स. जोशी, श्री. म. श्री. दीक्षित, श्री. राजा फडणीस, श्री. देवकीनंदन सारस्वत, श्री. प्रभाकर अत्रे, प्रा. वसंत सावत, प्रा. म. ना. अदवन्त



श्रोतृसमुदाय

अनुक्रमणिका

# वृत्तान्त

## ४ थे विभागीय साहित्य संमेलन
## आणि
## ८० वा वर्धापन दिन समारंभ
### दिनांक २५, २६ आणि २७ मे १९८६

**डॉ. म. वि. गोखले**

महाराष्ट्र साहित्य परिषदेची नवी कार्यकारिणी (१९८५-८८) १ जुलै १९८५ रोजी कार्यान्वित झाली. या नव्या कार्यकारिणीने आरंभीच दोन नव्या उपक्रमांची घोषणा केली होती. एक म्हणजे काही वर्षांपूर्वी बंद पडलेली विभागीय साहित्य संमेलने पुन्हा सुरू करणे आणि दुसरा असा की, मराठीतल्या एका ज्येष्ठ आणि श्रेष्ठ साहित्यिकाला प्रत्यक्ष परिषदेचे म्हणून रु. २०००/- चे 'महाराष्ट्र साहित्य परिषद' पारितोषिक आणि मानचिन्ह देणे. या दोन घोषणा प्रत्यक्षात आणण्याची कार्यकर्त्यांची तीव्र इच्छा होती. योगायोग असा जुळून आला की, २७ मे १९०६ रोजी पुण्यालाच स्थापन झालेली परिषद २७ मे १९८६ रोजी ८० वर्षे पूर्ण करीत होती. साहजिकच ८० वा वर्धापनदिन साजरा करण्याचे ठरले आणि त्यानिमित्त दिनांक २५, २६ आणि २७ मे १९८६ या दिवशी पुणे येथेच विभागीय साहित्य संमेलन आयोजित करावे असा विचार ठरला. वर्धापनदिनाचा समारंभ पुण्यात होणार असल्याने विभागीय साहित्य संमेलनही पुणे येथे साजरे होण्यात अशा रीतीने एक औचित्य होते.

केवळ, ऐंशीवा वर्धापनदिनच नव्हे, तर आता विभागीय साहित्य समेलनंही साजरे करायचे ठरल्यावर योग्य संमेलनाध्यक्षांची निवड करणे हे ओघानेच आले. साहित्य क्षेत्रात विशेष कामगिरी करणाऱ्या व्यक्तींच्या नावाचा शोध घेऊन कार्यकारिणीने एकमताने सुप्रसिद्ध नाटककार प्रा. वसंत कानेटकर यांची निवड केली. त्या निवडीला प्रा. कानेटकरांनीही मान्यता दिली. परिषदेचे अध्यक्ष आणि ५९ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांची स्वागताध्यक्षपदी नियुक्ती झाली. संमेलनाच्या उद्घाटनाला श्री. सुशीलकुमार शिंदे यांना आमंत्रित करण्यात आले. संमेलनाच्या शेवटच्या दिवशी म्हणजे २७ मे १९८६ रोजी ऐंशीव्या वर्धापनदिनाचा समारंभ साजरा करायचा होता. यासाठी श्री. विठ्ठलराव गाडगीळ यांची अध्यक्षपदी आणि प्रमुख पाहुणे म्हणून सुप्रसिद्ध हिंदी साहित्यिक श्री. कमलेश्वर यांची योजना करण्याचे ठरले. त्या दोघांची संमती त्वरित हाती आली.

अशा प्रकारे संमेलन आणि ऐंशीवा वर्धापनदिन या दोन्ही सोहळ्यांसाठी तयारी सुरू असतानाच परिषदेने नव्याने सुरू केलेल्या 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोपिका'चा १९८५ चा मानकरी ठरविण्यासाठी निवड समितीच्या बैठका होत होत्या. साहित्य क्षेत्रात विशेष कामगिरी केलेल्या एखाद्या व्यक्तीची निवड या पारितोषिकासाठी व्हावयाची होती. चिकाटीने सर्वांगीण चर्चा करून निवड समितीने एकमताने कविवर्य विन्दा करंदीकर यांची निवड जाहीर केली.

इथवर संमेलन आणि वर्धापनदिन दिमाखात साजरा करण्याच्या दृष्टीने जी पूर्वयोजना आवश्यक होती ती करण्याच्या कामाला वेग येत चालला होता. संमेलनानिमित्त स्मरणिका प्रसिद्ध करायचे ठरले. साहित्य परिषदेच्या स्मरणिकेत साहित्यिक दृष्टिकोण असणे आवश्यक असल्याने तसा विषय स्मरणिकेसाठी योजण्यात आला. प्रत्येक प्रमुख साहित्यप्रकारात लेखन करणाऱ्या नामवंत साहित्यिकाला त्याच साहित्यप्रकारातला कोणता लेखक आदर्श वाटतो यासंबंधी लेखन करायला सांगावे असे ठरले. नाटककार वसंत कानेटकर, कादंबरीकार गो. नी. दाण्डेकर, कवयित्री शांता शेळके, चरित्रकार वि. ग. कानेटकर, विनोदी लेखक द. मा. मिरासदार,



अनुक्रमणिका



समीक्षक सरोजिनी वैद्य, कथाकार शंकर पाटील यांना केलेल्या आवाहनानुसार त्यांनी लेखनसाहाय्य तत्परतेने केले.स्मरणिकेला 'साहित्यादर्श' असे नाव देऊन संपादनाची जबाबदारी सर्वश्री म. श्री. दीक्षित, म. वि. गोखले व म. ना. अदवंत यांच्यावर सोपविण्यात आली. स्मरणिकेच्या संपादनात श्री. राजेन्द्र बनहट्टी आणि श्री. राजा फडणीस यांचे संपूर्ण सहकार्य तर मिळालेच, परंतु स्मरणिकेचा अर्थव्यवहार सांभाळण्याचे दुष्कर कामही त्यांनी यशस्वीपणे पार पाडले. परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांची स्मरणिकेसाठी जाहिराती मिळविताना बहुमोल मदत झाली.

साहित्य संमेलन म्हणजे साहित्यिक-सांस्कृतिक स्वरूपाचा भव्य उत्सव. म्हणून या विभागीय साहित्य संमेलनात शंकर पाटील, द. मा. मिरासदार, वसंत सबनीस यांचे कथाकथन, नामवंत संपादक आणि समीक्षक यांचा प्रा. माधव मनोहर यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद, विन्दा करंदीकर, मंगेश पाडगावकर आणि वसंत बापट यांचे काव्यवाचन, पंडितकुमार गंधर्व यांचे सुश्राव्य गायन आणि नांदेडच्या साहित्य संमेलनात गाजलेला लोकवैभव (औरंगाबाद) निर्मित 'खानदेशचा मळा आणि मराठवाड्याचा गळा' (गीतरूप वहिणाबाई) असे भरगच्च आणि आकर्षक कार्यक्रम आयोजित करण्यात आले.

अशा भव्य वाङ्मयीन सोहळ्यासाठी पुण्यातली साहित्य परिषदेची वास्तू अपुरी पडली असती म्हणून संमेलनाचे तिन्ही दिवस सर्व कार्यक्रमांसाठी जवळच असलेल्या टिळक स्मारक मंदिराची जागा मुक्रर करण्यात आली. देखणी वास्तू आणि मोठं आवार. या योजनेमुळं पुण्यातल्या ग्रंथप्रेमी प्रकाशकांनाही उत्साह आला. मराठी प्रकाशक परिषदेने पुढाकार घेऊन विभागीय साहित्य संमेलनानिमित्त ग्रंथप्रदर्शन भरवलं आणि आवारात ग्रंथ प्रदर्शनाच्या मांडवाचा थाट उभा राहिला. प्रवेशद्वाराशी कमानीनं 'चौथे विभागीय साहित्य संमेलन आणि ८० वा वर्धापनदिन' साजरा होत असल्याची अक्षरं लेवून साहित्यप्रेमी रसिकांच्या स्वागताची तयारी दाखवली.

## पहिला दिवस :

२५ मे १९८६ रोजी सायंकाळी ५॥ वाजता संमेलनाध्यक्षांचं आणि उद्घाटकांचं आगमन झाल्यावरोबर संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री. शंकर पाटील, परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी आणि कार्यवाह राजा फडणीस यांनी प्रवेशद्वाराशी त्यांचं स्वागत केलं. सर्वप्रथम परिषदेच्या ८० वर्षापूर्वीच्या स्थापनादिनाला प्रत्यक्ष उपस्थित असलेल्या लोकमान्य बाळ गंगाधरांच्या पुतळ्याला अध्यक्षांनी पुष्पहार अर्पण केला. प्रेक्षागृहात सनईच्या मंगलघोषात रसिक प्रवेश करीत होते. ठीक ६ वाजता समारंभासाठी व्यासपीठाचा पडदा उघडला. समारंभ सुरू झाला. 'बहु असोत सुंदर संपन्न की महा– प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा' या गीतानं सारं वातावरण भरून गेलं. प्रा. वीणा देव आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी हे गीत गायिलं. नंतर परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी यांनी प्रास्ताविक केलं. प्रास्ताविक भाषणात संमेलन भरविण्यामागचा उद्देश आणि या विशिष्ट दिवसांच्या निवडीमागची भूमिका त्यांनी स्पष्ट केली आणि विभागीय संमेलनाची खंडित झालेली परंपरा परिषदेने पुन्हा सुरू केल्याचे जाहीर केले. संमेलनाच्या सोहळ्याचा आनंद घेत असतानाच महाराष्ट्रातील दुष्काळग्रस्तांच्या दुःखाची जाणीव साहित्यिकांना आणि साहित्य परिषदेला आहे असे सांगून, साहित्य परिषदेने या संमेलनाच्या उत्पन्नातून पाच हजार रुपयांची देणगी दुष्काळपीडितांच्या मदतीसाठी देण्याचा निर्णय घेतला आहे, अशी श्री. राजेन्द्र बनहट्टी यांनी घोषणा केली. त्यांच्या या घोषणेचे उपस्थित रसिकांनी टाळ्यांच्या गजरात स्वागत केले.

स्वागताध्यक्ष श्री. शंकर पाटील यांनी संमेलनाध्यक्ष, उद्घाटक आणि उपस्थित साहित्यप्रेमींचं स्वागत करून प्रा. कानेटकर आणि श्री. सुशीलकुमार शिंदे यांना पुष्पहार आणि गुच्छ अर्पण केले. यावेळी मोजक्या शब्दात श्री. पाटील यांनी प्रा. कानेटकर आणि श्री. शिंदे यांचा परिचयही करून दिला. नंतर कार्यक्रमाचे संचालक डॉ. म. वि. गोखले यांनी उद्घाटकांना दीप प्रज्वलन करून संमेलनाचे उद्घाटन करण्याची विनंती केली. दीपप्रज्वलन केल्यावर उद्घाटनाच्या भाषणात श्री. सुशीलकुमार शिंदे यांनी पुणे शहराने साहित्यक्षेत्रात केलेल्या कामगिरीचा गौरवपूर्ण उल्लेख केला. तसेच आज साहित्यक्षेत्रात नव्याने डोकावू लागलेल्या जाणिवांचा परखड आढावा घेतला. त्यांच्या भाषणातील अनेक सूचना आणि अपेक्षा मार्मिक होत्या. अनेक साहित्यिकांच्या लिखाणातील दाखले देऊन त्यांनी दलित साहित्य आणि दलित साहित्यिक यांच्यासंबंधी अभ्यासपूर्ण विवेचन केले. भाषणाच्या अखेरीला त्यांनी साहित्य परि-

षदेने दुष्काळनिधीला दिलेल्या पाच हजार रुपयांच्या देणगीचा अतिशय भारावलेल्या शब्दांत गौरवपूर्ण उल्लेख केला आणि महाराष्ट्र शासनातर्फे साहित्य परिषदेचे मनःपूर्वक आभार मानले.

संमेलनाध्यक्षांचे प्रमुख भाषण यानंतर झाले. प्रा. कानेटकरांचे भाषण म्हणजे एका जाणकार साहित्य-काराच्या प्रतिभाशाली दृष्टीला पडलेले स्वप्नच म्हणावे लागेल. त्यांनी साहित्यक्षेत्रातील अनेक प्रवृत्तींचा आणि अपप्रवृत्तींचा यथायोग्य समाचार तर घेतलाच, पण अलीकडच्या साहित्यात थोरपण का येत नाही या प्रश्नाच्या संदर्भात अत्यंत मूलभूत चिकित्सा केली. संमेलनांचे आयोजन, नाटचपरीक्षण मंडळाची कार्यपद्धती, मंत्र्यांची उपस्थिती, भाषांतरित साहित्यकृती आणि दलित साहित्याच्या निमित्ताने झालेले समाजजागरण अशा अनेक विषयांना स्पर्श करीत त्यांनी अत्यंत मार्मिक विवेचन केले. या भाषणाचे सर्वांनीच कौतुक केले. (प्रा. कानेटकरांचे संपूर्ण अध्यक्षीय भाषण या अंकात इतरत्र दिले आहे.)

अध्यक्षीय भाषणाने या उद्घाटनाच्या समारंभाची सांगता झाली असे सांगताना रात्रीच्या कार्यक्रमाची सूचना देत आभारप्रदर्शनाचा भाग राखून ठेवल्याचे संयोजकांनी सांगितले.

२५ मे च्या रात्री ठीक ९.३० वाजता मराठी रसिकांचे तीन आवडते कथाकार सर्वश्री शंकर पाटील, द. मा. मिरासदार आणि वसंत सबनीस यांच्या बहारदार कथाकथनाचा कार्यक्रम सुरू झाला. परिषदेचे कार्यवाह डॉ. म. वि. गोखले यांनी कथाकारांचे परिषदेतर्फे स्वागत केले. अडीच-तीन तास या कथाकारांच्या नाटचमय, उत्कंठापूर्ण आणि खेळकर कथा ऐकण्यात श्रोते रंगून गेले होते. या कार्यक्रमाबरोबरच संमेलनाचा पहिला दिवस संपला.

## दुसरा दिवस :

परिसंवाद म्हटलं की काहीतरी खुसखुशीत, खुमासदार पण विचारप्रवर्तक ऐकायला मिळणार अशी श्रोत्यांची अपेक्षा असते. २६ मे रोजी सकाळी ९.३० वाजता संमेलनात झालेल्या परिसंवादाने ही अपेक्षा पूर्ण केली.

परिसंवादाचा विषय होता– 'नियतकालिकांना भरती– दर्जेदार साहित्याला ओहोटी.' या परिसंवादाच्या अध्यक्षस्थानी प्रा. माधव मनोहर होते, आणि सहा वक्ते बोलणार होते. काही अपरिहार्य कारणामुळे त्यांपैकी श्री. माधव गडकरी उपस्थित राहू शकले नाहीत. प्रारंभी प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी परिसंवादाच्या आयोजनामागचा हेतू स्पष्ट करून विषयाच्या मर्यादा सांगितल्या. डॉ. सरोजिनी वैद्य यांनी विषयाचा उपन्यास केला. नियतकालिकांचे कार्य, अपेक्षा आणि सद्यःस्थिती यासंबंधी त्यांनी विस्ताराने मार्मिक विवेचन केले. नंतर 'अस्मितादर्श'चे संपादक डॉ. गंगाधर पानतावणे बोलले. त्यांनी 'दर्जेदार' या विशेषणाची चिकित्सा करून नियतकालिकातून येणारे दर्जेदार साहित्य थोडेच असणार अशी पुस्ती जोडली. याचवेळी त्यांनी काही दर्जेदार साहित्य प्रसिद्ध केलेल्या पण दुर्लक्षित असणाऱ्या नियतकालिकांचा संदर्भही दिला. श्री. एस्. के. कुलकर्णी हे 'स्वराज्य', 'सकाळ' या पत्रांतील संपादकीय अनुभव असलेले वक्ते यानंतर बोलत होते. त्यांनी आपल्या प्रदीर्घ अनुभवाने बनविलेली आपली मते सांगून दर्जेदार म्हणजे 'समीक्षक-मान्य' ही कसोटी अमान्य केली. त्यांच्या भाषणात सामान्यपणे वाचकांची अनास्था, दुर्लक्ष यासंबंधीची तक्रारही होती. प्रा. म. द. हातकणंगलेकरांनी आरंभीच परिसंवादाच्या विषयाची मान्यता व्यक्त करून, आपल्या इंग्रजी वाचनाच्या पार्श्वभूमीवर मराठीतील दर्जेदारपणाचे मूल्यमापन केले. यानंतर प्रा. स. शि. भावे यांनी आपल्या भाषणात नियतकालिकांनीच आज अनेक वाङ्मयप्रकार वाढविण्यास मदत केली आहे असे सांगून, ललित गद्य आणि वैचारिक लेखन यांच्या सीमारेषा पुसल्या जाण्यास नियतकालिकांनाच जबाबदार धरले. प्रा. भावे यांच्या भाषणात अनेक नामवंत मराठी लेखकांच्या लेखनाचा उल्लेख व कौतुक होते. परिसंवादाचा समारोप प्रा. माधव मनोहर यांनी अध्यक्षीय भाषणाने केला. नियतकालिके प्रथम स्थिर व्हावी लागतात आणि मगच त्यांना दर्जेदार साहित्य वाचकांना देता येते असा प्रस्ताव करीत,विविध ज्ञानविस्तारापासून तो अगदी अलीकडच्या नियतकालिकांपर्यंत आढावा घेत त्यांनी आपला विचार मांडला. मराठी वाङ्मयासंबंधी नियतकालिकांनी फार मोठे कार्य केले असल्याचे सांगून आज दर्जेदार, अभिजात लेखनच होत नाही तर ते नियतकालिकात येणार कसे असा प्रश्न उपस्थित केला. परिसंवादाला निवडक आणि जाणकार श्रोत्यांची उपस्थिती होती.

२६ मे ची सायंकाळ कवितावाचनाची होती. कार्यकारिणी सदस्य डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी कवीचे स्वागत केले. परिषदेतर्फे कवित्रय वसंत बापट, मंगेश पाडगावकर आणि विंदा करंदीकर यांनी आपापल्या ढंगात कवितांचे वाचन केले कवितेचा आशय वाचकांपर्यंत पोचविण्यासाठी कराव्या लागणाऱ्या शब्दोच्चारातील चढउतार, वाचनातील सुस्पष्टता आणि कवितांची निवड या बाबतीतला एक वस्तुपाठ या मान्यवर कवींनी या निमित्ताने सादर केला आणि त्याला श्रोत्यांकडून दादही मिळाली. त्याच रात्री पं. कुमार गंधर्व यांचे सुश्राव्य गायन झाले पंडितजींच्या पद्धतीने ठीक ९.३० ला कार्यक्रम सुरू झाला आणि जवळजवळ तीन तास सुरांच्या रंगतीत वातावरण रंगून गेले. ख्याल गायकीतले आपले वैशिष्ट्य दाखविण्यावरोबरच पंडितजींनी काही नाटयगीते आणि भावगीते गाऊन मैफल वहारदार केली. त्यांच्या गायकीचा चाहतावर्ग आवडीने सारा कार्यक्रम ऐकत होता आणि आपली पसंती व्यक्त करत होता.

## शेवटचा दिवस :

संमेलनाचा शेवटचा दिवस म्हणजे २७ मे १९८६. हा परिषदेच्या ऐंशीवा वर्धापनदिनाचा दिवस होता. वर्धापनदिनाचा समारंभ सायंकाळी ६ वाजता सुरू झाला. या समारंभाची सुरुवात करण्यासाठी पडदा उघडला तेव्हा प्रेक्षकांमध्ये कुजवूज सुरू झाली. परंतु कार्यक्रमाचे सूत्रसंचालन करणारे डॉ.म. वि. गोखले यांनी आरंभीच श्री. कमलेश्वर यांच्या अनुपस्थितीबद्दल उल्लेख करून त्यांची आलेली तारच वाचून दाखविली. त्यामुळे प्रेक्षकांमधली उत्सुक आणि चौकस कुजवूज शमली आणि प्रा. वीणा देव यांच्या शारदास्तवनाच्या गीताने समारंभ सुरू झाला. नंतर कार्याध्यक्ष राजेंद्र बनहट्टी यांनी प्रास्ताविक केले. प्रास्ताविक भाषणात त्यांनी साहित्य परिषदेच्या ८० वर्षांच्या वाटचालीचा आढावा घेतला आणि साहित्य परिषद ही महाराष्ट्रातली सर्वांत जुनी आणि सर्वांत कार्यक्षम संस्था असल्याचे प्रतिपादन केले. आजचा ८० वा वाढदिवस 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिका'चा नवा उपक्रम सुरू करून साहित्य परिषद साजरा करीत आहे, असे त्यांनी सांगितले.

श्री. शंकर पाटील यांनी खुमासदार शैलीत अध्यक्ष श्री. विठ्ठलराव गाडगीळ यांचा परिचय करून देऊन त्यांचे स्वागत केले. त्याचबरोबर त्यांनी यंदाचे 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' विजेते कविवर्य विंदा करंदीकर यांचेही स्वागत करून त्यांचा गौरव केला. यानंतर श्री. कमलेश्वर यांच्या अनुपस्थितीमुळे संमेलनाचे अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांना 'साहित्यादर्श' या स्मरणिकेचे प्रकाशन आणि महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिकाचे वितरण करण्याची विनंती करण्यात आली. साहित्य परिषदेचे कार्यवाह डॉ. म. वि. गोखले यांनी 'साहित्यादर्श' या स्मरणिकेच्या निर्मितीमागील भूमिका विशद करून सांगितल्यावर संमेलनाध्यक्ष प्रा. कानेटकरांच्या हस्ते तिचे रीतसर प्रकाशन झाले. पारितोषिकाच्या योजनेमागील पार्श्वभूमी साहित्य परिषदेचे कोषाध्यक्ष श्री.म.श्री. दीक्षित यांनी सांगितली. नंतर महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिकाचा रु. २०००।– चा धनादेश आणि मानचिन्ह प्रा. कानेटकर यांनी कविवर्य विंदा करंदीकर यांना प्रदान केले. तसेच शाल आणि पुष्पहार अर्पण करून त्यांचा सन्मान केला. ८० व्या वर्धापनदिनाच्या निमित्ताने परिषदेच्या काही कार्यकर्त्यांचा सत्कार यानंतर अध्यक्ष श्री. विठ्ठलराव गाडगीळ यांच्या हस्ते करण्यात आला. या सत्कारमूर्तीत सर्वश्री द. वा. डावरे, वि. त्र्यं. शेटे, न. का. घारपुरे, म. वि. फाटक, कुसुमाकर शिपी, भीमराव कुलकर्णी, म. श्री. दीक्षित आणि रा. व्यं. छत्रपती यांचा समावेश होता. कार्यकर्त्यांची व त्यांच्या कार्याची ओळख यावेळी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक डॉ. वसंत स. जोशी हे करून देत होते. श्री. विंदा करंदीकर यांनी सत्काराला उत्तर म्हणून छोटेसे भाषण करून आपल्या भावना व्यक्त केल्या.

अध्यक्ष श्री. विठ्ठलराव गाडगीळ यांचे अध्यक्षीय भाषण यानंतर झाले. आपल्या नर्म विनोदी शैलीत श्री. गाडगीळ यांनी मंत्री आणि साहित्यिक यांच्यातील संबंध हाच मुद्दा विशेषकरून खुलविला. त्यांनी मंत्र्यांच्या जीवनातले आणि संसदीय बैठकीत घडणारे अनेक किस्से सांगून आपली भूमिका मांडली. मराठी भाषेच्या उत्कर्षासाठी आपण कोणते प्रयत्न करीत आहोत याचीही कल्पना त्यांनी दूरदर्शनचे कार्यक्रम आणि सरकारी धोरण यांच्या संदर्भात स्पष्टपणे दिली. संमेलनाच्या समारोपाचे भाषण संमेलनाध्यक्ष प्रा. वसंतराव कानेट-

करांनी केले. यावेळी आपल्या अध्यक्षीय भाषणातील काही मुद्यांचे अधिक स्पष्टीकरण करण्याची संधी त्यांनी घेतली. तसेच म. सा. परिषदेच्या कार्यकारिणीचे कौतुक करून आभार मानले.

समारंभ चालू असतानाच एक दुःखद वार्ता संयोजकांकडे आली होती. शेवटी आभारप्रदर्शन करताना डॉ. म. वि. गोखले यांनी अत्यंत औचित्यपूर्ण रीतीने ती वार्ता सभेला सांगितली. वार्ता होती प्रा. अरविंद मंगरूळकर यांच्या निधनाची. अध्यक्षांसह सभेने काही वेळ स्तब्ध उभे राहून प्रा. मंगरूळकरांना आपली श्रद्धांजली वाहिली. त्या गंभीर वातावरणातच पसायदान होऊन समारंभ संपला.

संपूर्ण सोहळयाचा शेवट रात्रीच्या 'खानदेशचा मळा आणि मराठवाड्याचा गळा' या वहिणाबाईंच्या गीतांच्या संगीत कार्यक्रमाने झाला. कवयित्री वहिणाबाईंच्या कवितेचे यथार्थ मर्मदर्शन आणि त्यातील शब्दांच्या व शैलीच्या जाणकारीने सुरेल गायन यामुळे हा कार्यक्रम खूप रंगला. अस्सल ग्रामीण ढंग या संगीत कार्यक्रमाने पुणेकरांना दाखविला. कार्यक्रमाचे सादरकर्ते 'लोकवैभव'चे प्रा. फ. मु. शिंदे आणि त्यांचे सहकारी श्रोत्यांची दाद घेऊन गेले.

पुण्यासारख्या ठिकाणी अनेक कार्यक्रमांची सतत झुंबड उडालेलीच असते. मे महिन्यात तर विशेषच. तरीही विभागीय साहित्य संमेलनाच्या तिन्ही दिवसांतील सर्व कार्यक्रमांना आणि वर्धापनदिनाच्या समारंभाला रसिकांची पुरेशी दाद मिळाली. कथाकथन, काव्यवाचन, पं. कुमार गंधर्व यांचे गायन आणि बहिणाबाईची गीते या कार्यक्रमांना प्रवेशमूल्य होते. तरीही या कार्यक्रमांना श्रोत्यांचा समाधानकारक प्रतिसाद होता. संमेलनातील सर्व कार्यक्रम आटोपशीर, सुनियोजित आणि यशस्वी झाले असाच उपस्थित जाणकार रसिकांचा अभिप्राय पडला. संमेलनाच्या व्यासपीठावर मराठीतले मान्यवर कथाकार, कवी, समीक्षक आणि संपादक आणि साहित्यिक यांनी हजेरी लावली तर श्रोत्यांमध्ये गो. नी. दांडेकर, शंकरराव खरात, श्री.पु. भागवत, रा.ना. दांडेकर, विद्याधर पुंडलिक, आनंद यादव, दया पवार, मु. शं. किर्लोस्कर, अनुराधा पोतदार, य. दि. फडके यांच्यासारखी साहित्यक्षेत्रातली ज्येष्ठ आणि जाणकार मंडळी उपस्थित होती. साहित्यिक, साहित्यिक कार्यकर्ते, प्रकाशक, मुद्रक, संपादक आणि साहित्यप्रेमी रसिक यांनी संमेलन यशस्वी करण्यात संपूर्ण सहकार्य देऊन साहित्य परिषदेवरील लोभ व्यक्त केला. पत्रकारांनी संमेलनाच्या सर्व कार्यक्रमांना व्यवस्थित प्रसिद्धी दिली. साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य, परिषदेचे हितचिंतक आणि सेवकवर्ग यांनी संमेलन यशस्वी करण्यासाठी सर्व प्रकारचे सहाय्य केले. या सर्वांना मनःपूर्वक धन्यवाद.

## साभार स्वीकार

### कादंबरी

**सूर** : तारा वनारसे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. ३५ △ **कारमाझफ बंधू खंड १ व खंड २** : भाऊ धर्माधिकारी; अनु.; कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ९० △ **सायनाईड** : हनुमंत गवळी; हनुमंत गवळी, सोलापूर रोड, पुणे १३; १९८६; रु. २० △ **एक होती अनीता** : अमृता प्रीतम/पद्माकर जोशी; अनु.; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △ **कामिनी** : अमृता प्रीतम / पद्माकर जोशी–अनु-; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △ **गृहस्वामिनी** : मंगला निगुडकर– अनु.; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८५; रु. ४५ △ **कागद आणि सावली** : आनंद पाटील; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६; रु. ४१ △ **ॲडव्होकेट पांडुरंग** : बी. एम्. लोणकर; सौ. विमलाबाई लोणकर, ४४ पर्वती, पुणे ९; १९८६; रु. २५ △ **राजेश्री** : ना. सं. इनामदार; कॉंटिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ८० △ **धरती, सागर आणि शिपले** : अमृता प्रीतम– पद्माकर जोशी– अनु.; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △

# परिषद-वार्ता

## (१ मार्च ८६ ते ३१ मे ८६ अखेर)

### साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम :

**कै. ना. गो. चापेकर स्मृतिदिन** : दि. ५ मार्च ८६ रोजी कै. ना. गो. चापेकर स्मृतिदिनानिमित्त प्रा. डॉ. व. दा. कुलकर्णी (उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद) यांचे 'लोकमानसातील महाभारत' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिन** : कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त दि. २० मार्च ८६ रोजी प्रा. सौ. सुधा जोशी यांचे 'मर्ढेकर आणि गाडगीळ : काही समान वाङ्मयीन सूत्रे' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. विनायक कोंडदेव ओक स्मृतिदिन** : कै. विनायक कोंडदेव ओक स्मृतिदिनानिमित्त म. सा. परिषद व शिशुरंजन या दोन संस्थांतर्फे दि. २० एप्रिल ८६ रोजी बाल रंगभूमिविषयक व्याख्यानाचा कार्यक्रम आयोजित केला होता. डॉ. म.वि. गोखले या कार्यक्रमाचे अध्यक्ष होते.

**कै. श्रीधर व्यंकटेश केतकर स्मृतिदिन** : कै. श्रीधर व्यंकटेश केतकर स्मृतिदिनानिमित्त १० एप्रिल रोजी कमला नेहरू उद्यानातील अर्धपुतळ्यास परिषदेच्या वतीने पुष्पहार समर्पण करण्यात आला आणि दि. २१ एप्रिल ८६ रोजी प्रा. स. शि भावे यांचे 'वैचारिक कादंबरीची कलात्मकता' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. अरविंद मंगरूळकर दुखवटा सभा** : परिषदेचे माजी कार्यवाह प्रा. अरविंद मंगरूळकर यांचे दि. २७मे रोजी दुःखद निधन झाले. याच दिवशी झालेल्या परिषदेच्या ८० व्या वर्धापनदिन समारंभात माजी कार्यकर्ते म्हणून त्यांच्या सत्काराचा समावेश होता. प्रा.मंगरूळकरांच्या निधनाबद्दल दुखवटासभा दि. ५ जून ८६रोजी परिषदेत आयोजित केली होती. श्री. शंकर पाटील हे अध्यक्षस्थानी होते. याप्रसंगी सर्वश्री वामनराव देशपांडे, लीला अर्जुनवाडकर, के. पं. मंगळवेढेकर, भीमराव कुलकर्णी, गं. ना. जोगळेकर, भी. ज्ञा. जोशी, अरविंद पावळकर यांची श्रद्धांजली अर्पण करणारी भाषणे झाली.

दि. १३ एप्रिल८६रोजी कै भवानराव पंतप्रतिनिधी, औन्धकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ त्यांच्या छायाचित्रास हार अर्पण करण्यात आला.

**अभीष्टचिंतन** : म. सा. पत्रिकेचे माजी संपादक व कार्यकर्ते डॉ. भालचंद्र फडके यांच्या वयास साठ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल झालेल्या सत्कारप्रसंगी परिषदेतर्फे पुष्पगुच्छ देऊन त्यांचे अभीष्टचिंतन करण्यात आले.

सुप्रसिद्ध समीक्षक प्रा. माधव मनोहर यांना पंचाहत्तर वर्षे पूर्ण झाल्याबद्दल परिषदेतर्फे त्यांचे अभीष्टचिंतन करण्यात आले.

### परीक्षा :

जानेवारीत झालेल्या मराठी परीक्षात पुढीलप्रमाणे उमेदवार प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले.

**विशारद** : द. वि. लकडे– पुणे केंद्र.

**प्राज्ञ** : प्रतिभा प्रभाकर औटी– कोपरगाव केंद्र.

**प्रवेश** : स्वाती माधव म्हाळंक– पुणे केंद्र.

**प्रथमा** : नागेश विजयकुमार कुलकर्णी- तळेगाव दाभाडे केंद्र.

### देणग्या :

परिषदेच्या ८० व्या वाढदिवसानिमित्त खालील व्यक्तींनी देणग्या दिल्या. श्री. शं. बा. शिंपी, तळोदे रु. १०१।– श्री. वि. त्र्यं. शेटे, पुणे रु. १०१।– डॉ. प्र. न. जोशी, पुणे रु. १०१।–, डॉ. भीमराव कुलकर्णी, पुणे रु. १०१।– श्री. मा. अ. दीक्षित, मुंबई रु. ५१।–, श्री. भी. ज्ञा. जोशी, पुणे रु. २५।–

या सर्व देणगीदारांची परिषद आभारी आहे.

### कार्यकारी मंडळ सभा :

दि. २५।५।८६ रोजी झालेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेत पुढील ठराव संमत करण्यात आले. १) विभागीय संमेलनाच्या उत्पन्नातून महाराष्ट्रातील दुष्काळग्रस्तांच्या मदतीसाठी मुख्यमंत्री निधीस रु. ५००१/– ची देणगी साहित्य परिषदेतर्फे देण्यात यावी. २) परिषदेच्या शाखांसंबंधीच्या अडीअडचणींचा विचार करून निर्णय घेण्यासाठी पुढील सदस्यांची समिती नेमण्यात यावी : सर्वश्री राजेन्द्र बनहट्टी, राजा फडणीस, म. श्री. दीक्षित, देवकीनंदन सारस्वत, प्रा. लीला गोविलकर.

हो भूमी...
महान् भूमी...
महाराष्ट्र भूमी...
वेरूळ अजिंठ्याच्या चित्रशिल्पानं नटलेली,
सह्याद्री अन् सातपुडा पर्वतराजींनी मंडित,
विस्तीर्ण रुपेरी सागर किनारा लाभलेली,
तापी, गोदावरी, कृष्णा, पैनगंगा गिरजेच्या जलौघांनी
पुनीत झालेली ही भूमी,
महान संतांची, पराक्रमी योद्ध्यांची,
वैभवशाली भूतकाळाशी नातं सांगणारी ही भूमी...
आपले हे महाराष्ट्र राज्य,
रौप्य महोत्सवी वर्षाची
गुढी उभारून या महोत्सवी मंगलमय
सोहळ्याच्या सांगता प्रसंगी,
साहित्य, कला, संस्कृतीची जोपासना करीत
विज्ञान युगाकडे झेपावत आहे
या मंगल प्रसंगी एकच निर्धार-
अखिल मानव जातीच्या कल्याणाचा,
समतेचा आणि राष्ट्रीय एकात्मतेचा
संत महात्म्यांनी दिलेला संदेश जोपासून,
राज्य व राष्ट्र उभारणीच्या प्रयत्नात सहभागी होण्याचा,
जनकल्याणासाठी कटिबद्ध होण्याचा...
हा निर्धार साकारण्यासाठी एक जुटीने प्रयत्न करण्याची...
प्रतिज्ञा या भूमीची, महान भूमीची, महाराष्ट्राची...

---

**महाराष्ट्र शासन, गतिमान आणि कृतिशील शासन**

---

माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,
मुंबई- ४०० ०३२

# महाराष्ट्र साहित्य परिषदेची प्रकाशने

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड १**
(आरंभ ते इ. स. १३५०)
संपादक : डॉ. शं. गो. तुळपुळे : रु. १२५

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड २ (भाग १ व २)**
(१३५० ते १६८०)
संपादक : डॉ. स. गं. मालशे : रु. ११०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ३**
(१६८१ ते १८००)
संपादक : प्रा. रा. श्री. जोग : रु. ३०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ४**
(१८०१ ते १८७४)
संपादक : प्रा. रा. श्री. जोग : रु. ३०

**मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ५ (भाग १ व २)**
(१८७५ ते १९२०)
संपादक : प्रा. रा. श्री. जोग : रु. ५५

आवृत्ती संपत आली
**भाषा व साहित्य : संशोधन खंड १**
संपादक : डॉ. वसंत स. जोशी : रु. ३०.

नुकताच प्रसिद्ध झाला
**भाषा व साहित्य : संशोधन खंड २**
संपादक : डॉ. वसंत स. जोशी
डॉ. गं. ना. जोगळेकर : रु. ९०

* वाङ्मयेतिहासाचे पाचही खंड एकदम घेतल्यास सवलत रु. २८० + टपाल खर्च.
* सर्व प्रकाशनांना १५ टक्के कमिशन दिले जाईल.

**कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ३०
(दूरध्वनी ४४२९६३)